# संकल्प

सहकारी कर्मयोग म्हणजे इंग्रजीत ज्याला Team work म्हणतात ते. वास्तविक सहकार नि कर्मयोग या तत्त्वाचा प्रचार नि प्रसार भारतीय संस्कृतीने प्राचीन काळापासून केलेला आहे. त्याच मूल्यांची ही वेगळी मांडणी करण्याचा प्रयत्न या लहानशा ग्रंथात मी केलेला आहे.

हे एक नाट्य-संकीर्तन आहे. त्याचा पहिला प्रयोग साताऱ्यात होत आहेच. आणखीही अनेक प्रयोग करावे असा मनोदय आहे.

या नाट्यसंकीर्तनाचं लेखन करत असताना मला सदर्भ-साहित्य पुरविण्याचं बहुमोल साहाय्य सातारा येथील श्री. नारायणराव सी. कुलकर्णी यांनी अत्यंत तत्परतेने केलं. नारायणरावांचा व माझा स्नेह अगदी अलीकडेच जमलेला. या लेखन-कार्यात तो दृढ झाला. नारायणरावांनी अत्यंत आत्मीयतेने दिलेल्या सहकार्याचं ऋण फार मोठ आहे. त्याचा पुनरुच्चार करणं औपचारिक दिसेल.

या नाट्य-संकीर्तनाच्या कितीतरी प्रती विद्यार्थी, शिक्षणसंस्था व सांस्कृतिक संस्था यांना सवलतीच्या मूल्यात दिल्या गेल्या आहेत. माझ्यावर लोभ ठेवणाऱ्या जाहिरातदार मित्रांनी मला सक्रिय उत्तेजन दिल्यानेच तें शक्य झालं. त्यांचा मी अतिशय आभारी आहे.

विमा छापखान्याचे कार्यकारी संचालक श्री. शि. गो. भावे व छापखान्यातील त्यांचे सर्व सहकारी यांनी मला अत्यंत आपुलकीनं केलेलं साहाय्य तर मला नेहमीच संस्मरणीय वाटेल. अवघ्या आठदहा दिवसांत त्यांनी सर्व मुद्रण संपविलं. मी त्यांचे मनःपूर्वक आभार मानतो.

मुखपृष्ठाच्या वेष्टणावरील चित्र महाराष्ट्र राज्याच्या प्रसिद्धि-संचालकाच्या सौजन्यामुळच देता आलं. मी त्यांचा फार ऋणी आहे.

सातारा      त्र्यं. न. कुलकर्णी

मध्यरात्र, १९६३-६४



कलशस्य मुखे विष्णुः कंठे रुद्रः समाश्रितः।
मूले तत्र स्थितो ब्रह्मा मध्ये मातृगणाः स्मृताः॥
अत्र गायत्रि सावित्रि शांतिपुष्टिकरी तथा।
आयांतु देवपूजार्थं दुरितक्षयकारकाः॥

ॐ

॥ श्रीः ॥

समुद्रवसने देवि ! पर्वतस्तनमण्डले !
विष्णुपत्नि ! नमस्तुभ्यं पादस्पर्शं क्षमस्व मे !
नारायणं नमस्कृत्य नरं चैव नरोत्तमम् ।
देवीं सरस्वतीं चैव ततो जयमुदीरयेत् ॥
ॐ नमोजी आद्या । वेदप्रतिपाद्या ।
जयजय स्वसंवेद्या । आत्मरूपा ॥

*

## — अंगणात रंगावलि रंगेना राधेला !

जाहली पहाटवेळ , उठि बाळा घननीळा !
भूपाळी आळवि रे, अधरि धरी वेणूला !
शांत या निवांत क्षणी, नादसुधा झणि सिंचुनि,
नवजीवन देइ हरी, फुलवि श्रांत वसुधेला !
थबकली नदी यमुना, भेटाया तुज कृष्णा,
डोही तिज आलिंगुनि, बाहु दे पुढे तिला !
तुजसंगे खेळु खेळ, म्हणुनि जमत गोपबाळ,
धेनूहि हंबरती, ऊठ, सुखवि त्या सकला !
दर्शनास तव माधव, थांबलाहि अरुणोदय,
क्षितिजांतरि वाट पाही, बोलवि रविराजाला
शिरि घेउन दूधलोणी, थांबल्यात या गोळणि,
दर्शनाविना प्रभुच्या, जातिल का मथुरेला ?
वनमाली ये सजणा, गोकुळचा जीव सुना,
अंगणात रंगावलि, रंगेना राधेला !

उत्तिष्ठोत्तिष्ठ गोविन्द उत्तिष्ठ गरुडध्वज।
उत्तिष्ठ कमलाकान्त त्रैलोक्यं मंगलं कुरु॥

वक्रतुंड महाकाय कोटिसूर्यसमप्रभ।
निर्विघ्नं कुरु मे देव सर्वकार्येषु सर्वदा॥

## — या मानवा नवगायना

[ यमन, त्रिताल ]

गणनायका घ्या वंदना,
ही प्रार्थना शिवनंदना !
शिणली धरा गज-आनना,
कंठातुनी ये तान ना,
करणे त्वरा जगरक्षणा,
या मानवा नवगायना !
चैतन्य या संकीर्तना !

## सरस्वतीवंदन

या कुंदेंदुतुषारहारधवला या शुभ्रवस्त्रान्विता।
या वीणावरदंडमंडितकरा या श्वेतपद्मासना॥
या ब्रह्माच्युतशंकरप्रभृतिभिर्देवैः सदा वंदिता।
सा मां पातु सरस्वती भगवती निःशेषजाड्यापहा॥

✶

## — गौर तिचा

गौर तिचा वर्ण जसा चांदण्याचा हार,
शुभ्रवस्त्रधारी ! वीणा करी अलंकार !
ब्रह्म, विष्णु, शिवही तिजला वंदिती अपार,
सरस्वती बुध्दिदात्री, मला तारणार !

# श्रोत्यांना अभिवादन

श्रूयतां देवदेवेश नारायण जगत्पते।
त्वदीयेनावधानेन कथयिष्ये शुभाः कथाः।

देवदेवेश नारायण, ऐका! आपल्या आशीर्वादाच्या बळावर मी कथा निवेदन करत आहे.

अस्तु श्रीः मंगलानि भवन्तु॥

आपणांस लक्ष्मी प्रसन्न असो आणि आपले मंगल होवो!

श्रोतेजन नारायण, त्यांचे हे गुणगायन! आज माझ्या या नाट्य-संकीर्तनाला उपस्थित असलेल्या सर्व देवांचं व जीवांचं सुस्वागत असो. माझा पहिला श्रोता खुद्द श्रीभगवान् विष्णु! विश्वाच्या उद्धाराकरता, धर्माच्या संरक्षणाकरता, मानवाच्या कल्याणाकरता ज्यानं रामकृष्णासारखे बहुविध अवतार घेतले तो शंखचक्रधारी भगवान् आज इथं, तुमच्याआमच्यासमोर साक्षात् उभा आहे. खरं नाही वाटत? कशावरून म्हणता? कोणाच्या साक्षीची गरजच काय? खुद्द श्रीकृष्णांनीच एकदा नारदांना वचन देऊन ठेवलं आहे,

नाहं वसामि वैकुंठे योगिनाम् हृदये रवौ।
मद्भक्ता यत्र गायन्ति तत्र तिष्ठामि नारद॥

मी वैकुंठांत राहात नसतो तर योग्यांच्या हृदयांत. हे नारदा, माझे भक्त जिथंजिथं माझं गान गातात तिथंतिथं मी उभा असतो.

भगवंताचे एक थोर भक्तही आज इथं आपल्या संकीर्तनप्रसंगी उपस्थित राहिले आहेत. त्यांचं नाव भक्तश्रेष्ठ श्रीहनुमान्. या भक्ताचं माहात्म्य काय वर्णावं! श्रीरामचंद्र प्रभु हनुमानाला म्हणतात, "**एकैकस्योपकारस्य प्राणान् दास्यामि ते कपे!**" तुझ्या एकेका उपकारासाठी मी एकेक प्राण दिला तरी त्या उपकाराची फेड होणं शक्य नाही.

राम एकदा मारुतीला म्हणाले, "काहीही वर माग. मी त्याची पूर्ति करीन।"

हनुमानांनी कोणता वर मागितला ? ऐका :

> यावद्रामकथा वीर चरिष्यति महीतले ।
> तावच्छरीरे वत्स्यन्तु प्राणा मम न संशयः ॥
> यच्चैतच्चरितं दिव्यं कथा ते रघुनंदन ।
> तन्मामप्सरसो राम श्रावयेयुर्नरर्षभ ॥

जोपर्यंत रामकथा जगात राहील तोपर्यंत माझ्या शरीरात प्राण राहावे व मी जिवंत असेपर्यंत अप्सरांनी आपलं चरित्र मला नेहमी गाऊन दाखवावं.

हे ऐकताच रामचंद्रांनी सिंहासनावरून उठून अत्यंत प्रेमभरानं हनुमानाला आलिंगन दिलं व ते म्हणाले, "हे कपिश्रेष्ठा, तुझ्या इच्छा पूर्ण होतील !"

कलियुगातल्या मानवी जीवनातही आपण हेच अनुभवत नाही का ! एखाद्या माणसाचं कर्तृत्व कितीही प्रभावी असलं तरी ते अल्पजीवी असतं, पण त्या कर्तृत्वाच्या कीर्तीचा सुगंध मात्र सर्वत्र नि सतत दरवळत राहतो. रामावतार झाला नि संपला पण रामनामाचं यश चिरंजीव आहे हे जाणून केवळ नामसंकीर्तनात खंड पडू नये एवढ्याकरता हे थोर भक्त हनुमान स्वतः चिरंजीव झाले.

> अश्वत्थामा बलिर्व्यासो हनूमांश्च बिभीषणः ।
> कृपः परशुरामश्च सप्तैते चिरजीविनः ॥

अशा कीर्तनप्रसंगी या थोर भक्तश्रेष्ठाकरता एक बैठक राखून ठेवण्याची प्रथा आहे आणि म्हणूनच त्यांच्याकरता इथं हा पाट मांडला आहे. खुद्द भगवंत उभे आहेत. त्यांची प्रार्थना आपण केलीच आहे. आता मारुतिरायांना वंदन करू.

> यत्रयत्र रघुनाथकीर्तनं ।
> तत्रतत्र कृतमस्तकांजलीम् ॥
> बाष्पवारिपरिपूर्णलोचनं ।
> मारुतीं नमत राक्षसांतकम् ॥

जिथंजिथं रघुनाथकीर्तन चाललेलं असतं तिथंतिथं हात जोडून साश्रु नयनांनी उपस्थित राहणाऱ्या राक्षसांतक मारुतीला आमचा नमस्कार असो !

जे रामनाम ऐकायला रामभक्त श्री मारुतिराय सदैव आतुर असतात त्या रामनामाला विसरून कसं चालेल?



## —नामसंकीर्तन

राम, हरे राम, हरे राम, सीतामाई
राम राम राम राम रामनाम गाई !

रामकथा गावी रामकथा सांगावी,
रामकथा घ्यावी रामकथा द्यावी !
रामकथा कामी रामकथा विश्रामी
रामकथा डोई रामकथा देही !
रामकथा ल्यावी रामकथा ध्यावी,
राम राम राम राम रामनाम गाई ....!

श्रोत्यांची महति तर वर्णावी तितकी थोडीच.

श्रीसमर्थ म्हणतात.

"आता वंदू श्रोतेजन। भक्त ज्ञानी संत सज्जन। विरक्त योगी गुणसंपन्न। सत्यवादी ॥ जे नाना अर्थामृताचे भोक्ते। जे प्रसंगी वक्तयाचे वक्ते। नाना संशयांचे छेदिते। निश्चयी पुरुष ॥ ज्यांची धारणा अपार। जे ईश्वराचे अवतार। नातरी प्रत्यक्ष सुरवर। बैसले जैसे ॥ जे अखंड सावधान। जयासि त्रिकाळीचे ज्ञान। सर्वकाळ निरभिमान। आत्मज्ञानी ॥ जें जें कांही आठवावे। तें तें तयासि पूर्वीच ठावे। तेथें काय अनुवादावे। ज्ञातेपणेंकरूनी ॥ तुम्ही श्रोते जगदीशमूर्ति। तेथें माझी व्युत्पत्ति किती। बुद्धिहीन अल्पमती। सलगी करितो ॥ समर्थाचा पुत्र मूर्ख जगी। परी सामर्थ्य असे त्याचिया अंगी। तुम्हा संताची मी सलगी। म्हणोनि करितो ॥ व्याघ्र सिंह भयानक। देखोनि भयचकित होती लोक। परी त्याची पिली निःशंक तयापुढें खेळती ॥ माझा आदाय जाणोनि जीवे। आता उचित ते करावे। पुढें कथेसि अवधान द्यावे। म्हणे दासानुदास।"

श्री ज्ञानेश्वर महाराजांनीही श्रोत्यांचं श्रेष्ठत्व जाणून त्यांना वंदन केलं आहे.

जैसे शारदीचिये चंद्रकळे-। माजि अमृतकण कोंवळे। ते वेंचिती मनें मवाळे। चकोरतलग॥ तियापरी श्रोता। अनुभवावी हे कथा। अति हळुवारपण चित्ता। आणूनिया॥ ऐसा समाव मायबापाचा। नव्हे ऐसे जरी दत्ती वाचा। तरी अधिक दयाचा। संतोष आथी॥ हा ज्याचे ज्ञानेभरु गाये। दयाचि अप्राप्य काही आहे!। म्हणऊनि मी प्रवर्तो लाहे। ग्रंथी इये॥ तरी न्यून ते पुरवे। अधिक ते सरते। कर्मनि घ्यावे हे तुमचे। विनविन ज्ञान॥

श्रोत्याच माहात्म्य वर्णावे तेवढे थोडे! श्रोते गुणग्राही असले तरच वक्त्याच तेज पडणार? मुग्री श्रोते जमले तरच वक्ता हा वक्ता ठरणार! नाहीतर त्याच वक्तृत्व म्हणजे शुद्ध अरण्यरुदन! आपल्या व्यवहारातली उदाहरण पाहा ना! एखाद्या वक्त्याला माहीत असत की, आपल्या श्रोत्या सुरू झाल्या की जातं देखील आपल दळण बंद करत. मग तो ठाणशी शक्कल लढवितो नि जिथे नेहमीच गर्दी असते अशा एखाद्या चौकात, मशीत, बागेत नाहीतर चौपाटीवर आपल भाषण ठोकून देतो! कुणी ऐको वा न ऐको, चार माणस तरी समोर आहेत ना, एवढच त्याला समाधान असते! लंडनमधल्या 'हाइड-पार्क वक्त्याच' उदाहरण जगप्रसिद्ध आहेच

वाचकांशिवाय वर्तमानपत्र चालल आहे का कधी? आजाच्या लोकशाहीच्या काळात मतदारांशिवाय उमेदवार कुठले नि नगरपिते, आमदार, नामदार, खासदार, मंत्रि नि राष्ट्रपति तरी कुठले? इतका इतका कोरम भरल्या शिवाय काही काही सभा भरूच शकत नाहीत आपली विद्वत्ता ऐकायला चार मडळी हवीतच असं कोणालाही वाटणारच उच्चपदस्थ अधिकारी-वर्गांची भाषण ऐकायला शाळेतल्या पोराना आजकाल वेठीला धरल जात ते का बर?

श्रोत्याच महत्त्व ज्ञानेश्वर रामदासाच्या भाषेत सांगितलच आहे. श्रोत्याना उद्देशून समर्थ म्हणतात, "जे ईश्वराचे अवतार!" ही तुलना खरच किती समर्पक आहे कुशलवानी रामायण गायल, ऐकणारे श्रोते कोण तर स्वत श्रीराम! अर्जुनाने आपली मनोव्यथा ऐकविली ती श्रीकृष्णाला आणि भगवानांनी भगवद्गीता सांगितली त्या धनुर्धराला! नरनारायणाचा तो वादसंवाद! अध्यात्मरामायणात स्वत शंकरानी पार्वतीला रामचरित्र सांगितल आहे व्यास महामुनींनी तर कमालच केली महाभारत रचायच्या वेळी लेखनिक नि श्रोता म्हणून विद्यादात्या श्रीगजाननाचीच नेमणूक त्यानी केली तिजोरीच

# पहिले कीर्तनकार ? नव्हे, आद्य पत्रकार !

मला श्रीनारदमुनींच्याबद्दल विशेष आपुलकी वाटावी हे साहजिकच नाही का ? मी अगदी अर्वाचीन पत्रकार. अणुकाळातला किंवा अंतराळ-युगातला म्हणा, हवा तर. नारदमुनी हे अगदी प्राचीन काळी होऊन गेलेले आद्य पत्रकार ! पत्रकारच नव्हे तर काय ! जगातले पहिले कीर्तनकार असं त्यांना म्हटलं जातं. प्रभुगुणगायन करत करत ते त्रैलोक्यात हिंडत नि इकडच्या वार्ता तिकडे कळवत. संदेशवाहन हे त्यांचं प्रमुख कार्यक्षेत्र होतं. खुद्द ब्रह्मदेवाचे ते मानसपुत्र. साहजिकच देवादिकांचं राज्य अबाधित राहावं याची त्यांनाही चिंता ! स्वर्ग, पृथ्वी व पाताळात केव्हाही संचार करायचा कायमचा परवाना–पासपोर्ट–त्यांना मिळालेला होता. [आमच्यासारख्या कलि-युगातल्या पत्रकारांना हेवा वाटावा त्यांचा. तुम्हाआम्हाला पासपोर्ट मिळवण्या-करता किती सायास पडतात ! एखाद्या लहानशा राज्याच्या उद्‌घाटनमंत्र्याला भेटायचं तर त्याच्या मानलेल्या मावसबहिणीपासून तो तहत पट्टेवाल्यापर्यंत वशिला बांधावा लागतो, भेटपत्रं छापून घ्यावी लागतात. मग परदेशाच्या पासपोर्टची गोष्ट दूरच राहिली.]

नारदमुनींच्या वीणेचा मधुरध्वनि हाच त्यांचा पासपोर्ट ! चिपळीची एक चपखल टाळी हेच त्यांचं भेटपत्र. या आद्य पत्रकाराला कुठंही प्रवेश, अन् केव्हाही ! विश्वाचा कारभार हाकून शिणलेले भगवान् विष्णु श्रीलक्ष्मी-देवींच्या हातचा विडा रंगवीत विश्रांतीकरता अंग टेकवायच्या तयारीत असावेत नि त्या नाजुक क्षणी दाराशी वीणा झंकारावी, "नारायण नारायण !"

नारदाच्या स्वागताला नारायण तातडीनं उठलेच म्हणून समजावं । लक्ष्मीदेवी देखील खूष होत ! हे ताजं, बोलकं नि संगीत वर्तमानपत्र कुणाला प्रिय असणार नाही !

" तिकडे विश्वामित्रानं घोर तपश्चर्या मांडली आहे. खुद्द देवेंद्रांच्या सिंहासनाला धोका निर्माण झाला आहे ! " असल्या महत्त्वाच्या नि मन-

पाहिजे याची कल्पना करा. तात्बडतोब देवांच्या तातडीच्या बैठका होत नि उपाययोजना केली जाई. एखाद्या मेनकेची योजना करण्यात येई. शत्रू तो शत्रू! त्याचा पाडाव करण्याकरता हुकमी पडेल ते शस्त्र वापरायचं, आहे काय त्यात? असा साधासुधा हिशेब देवांना देखील सुचतो बरं का!

सांगायचं तात्पर्य असं की मग ही मेनका विश्वामित्रासारख्या तेजस्वी तपस्व्यापुढं जाऊन गायननृत्य करी, अनेक प्रकारच्या मोहक अंगविक्षेपांनी त्याच्यावर भूल टाकी, प्रणयरंगांत त्याला गुदमरून सोडी. अर्थात् व्हायचं ते होई. देवरिपूंच्या तपःसाधनेला तडा जाई, इंद्राचा मुकुट धड राही नि नारदांचे खडाव पुन्हा विश्वसंचाराला बाहेर पडत!

अन् राजकारणांत हे असंच चालत असतं. पहिल्या दुसऱ्या महायुद्धांत गाजलेल्या माताहारीसारख्या गुप्तहेर स्त्रियांची रोमांचकारक चरित्रं काय दर्शवितात? परवापरवा जगभर मिटक्या मारत वाचलं गेलेलं इंग्लंडमधलं कीलर प्रकरण काय सांगतं? कीलररूपी मेनकेमार्फत रशिया इंग्लंडवर कुरघोडी करू पाहत होता? की इंग्लंड रशियाला बनवू पाहत होता? की या दोन राष्ट्रांच्या मुत्सद्यांना त्या बाईनंच टोपी घातली? राजकारण हा सत्यसंशोधनाचा विषय नव्हे असं ही पाश्चात्य राष्ट्रं मानतात, तेव्हा हे प्रकरण पुष्कळ अंशी असंच गुलदस्तात राहणार हे मात्र नक्की!

जगाच्या इतिहासांत अजरामर होऊन गेलेले मोठमोठे मुत्सद्दी हे हाडाचे पत्रकार असत. आमचे पत्रकार नारदही असेच पट्टीचे राजकारणी मुत्सद्दी होते. महाभारतातल्या सभापर्वातली नारदनीति या दृष्टीनं अभ्यसनीय आहे. मयासुरानं निर्मिलेल्या सभेत धर्मराज बसला असता त्याला नारदांनी जे धडे दिले ते भारतीय राजकर्त्यांनी जरूर अभ्यासावे असं सुचवावंसं वाटतं.

धन-चर-दूतांचिया गोष्टी। राष्ट्र अवलोकिशी की दृष्टी। नष्टा तस्करांचिया राहटी। मंत्रिशी की ऐकता॥ नेमाहून आगळे धन। घेऊन मन्नांते पीडण। करिती जे अयोग्य प्रधान। ते पदातील करिसी की॥ साम, दान, दंड, भेद। इंद्रजाळ मंत्रोरूप। अष्टोत्तराय ऐसे सुबुद्ध। पंडितवर्य पोळ्ठी॥ अजिंक्य शत्रूते जिंकावे॥ जिंकल्याते प्रतिपाळावे। शरणागताते रक्षावे। ऐसे करीत असशी की॥ सहस्र मूर्खांते दवडून। एक पंडित ज्ञानसंपन्न। संग्रहूनि त्याचे मन। स्वस्थ ऐसे करिसी की॥ एका दुष्टाची संगती। पद्मलग्न सुरसंपत्ती। नाशूनि भोगवी अपकीर्ती। ऐसे जाणव

अवसरी की ॥ एक ठायीं बैसोनि ज्ञानी । एक प्रेरिते महत-कर्मी । एक ठेविते मनींचे मनी । हे जाणत आश्चर्य री ॥ दखियाते प्रत्यक्ष यमु । पुण्यात्मा परम सौम्यु । परीक्षोनि अधमोत्तमु । यथेष्ट की आज्ञापिती ॥ परद्वीपीच्या सामान्य वस्तु । वणिक आणिती स्वरूनि अर्थु । त्यांना पुरवुनि मारगु । लाभ चौगुणा देती री ॥ (मुक्तेश्वर)

राजकारण, देशकारभार, धर्मकारण इतकंच काय पण रोजच्या संसारात देखील प्रथम स्वार्थाला जपावं लागतं. स्वतःला महान परमार्थी समजणारे भगवद्भक्त तर स्वतःच्या अयुष्य उन्नतीचा स्वार्थच मनाशी बाळगत नाहीत का? तुम्ही-आम्ही मनाशी ज्या इच्छा मनगटाशी बाळगतो त्या खरोखर किती लहान असतात. चांगली बायको मिळावी-जमल्यास सुस्वरूप व भरपूर हुंड्यासह-, चांगला नवरा लाभावा, त्याची मोटर, निदान स्कूटर असावी, नोकरीत बढती मिळावी, व्यापारात बरकत यावी, शब्दकोड्यांत लाट लागावी, परीक्षेत यश मिळावं वगैरे वगैरे पण अध्यात्माचा ध्यास घेणाऱ्या या भक्तांना खुद्द परमेश्वराच्या मांडीवर बसून त्याची दाढी पकडायची हाव असते. सर्वसामान्य माणसाच्या स्वार्थापेक्षा त्यांचा स्वार्थ कितीतरी मोठा. त्याला म्हणायचं असतं मात्र परमार्थ. म्हणजे पराकोटीचा स्वार्थ. हजारातल्या नऊशे नव्याण्णव लोकांना हा परमार्थ जमण्यासारखा नसतो।

स्वतः भगवंतच म्हणतात, "मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद् यतति सिद्धये। यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः ॥ हजारातून एखादा माणूस माझ्या प्राप्तीच्या खटपटीला लागतो अन् अशी खटपट करणाऱ्यातल्या एखाद्यालाच माझी कदाचित् ओळख पटते

ते हा आपण सामान्य माणसांनी उत्कृष्ट प्रतीचा स्वार्थ साधला, धड संसार केला तरी पुष्कळ झालं.

सद्गुरु श्रीसमर्थ रामदास म्हणतात, "आधी प्रपंच करावा नेटका। मग घ्यावे परमार्थ विवेका" प्रपंचाकडे पाठ फिरवून परमार्थामागे धावणाऱ्यांचा तर त्यांनी स्पष्ट शब्दांत धिक्कार केला आहे

"प्रपंच सांडोनि परमार्थ केला। तरी अन्न मिळेना खायाला। मग तया करंट्याला परमार्थ कैसा!' तुकाराम महाराजदेखील म्हणतात, "जोडुनिया धन उत्तम व्यवहारे। उदास विचारे वेच करी" रामदास म्हणतात,

रामदास म्हणतात, "पाहिजे सावधपण सर्वविषयी।" नंतर तर ते

तर नारदमुनी हे सर्वार्थानं आमच्या पत्रव्यवसायाचे आद्य संस्थापक ठरले असते.

मला श्रीनारदांचं स्मरण आज विशेष उत्कटतेनं का होत आहे हे आपण सहज ओळखाल. नारद हे कीर्तनसंस्थेचे आद्य आचार्य नि मी आज त्यांच्या या व्यासपीठावर किंचित् भीतभीत पण अत्यादरानं पाऊल टेकत आहे. नारद हे पहिले संदेशवाहक म्हणजे वार्ताहर. माझाही उद्योग तोच म्हणजे पत्रकाराचा. नारद त्रैलोक्यात भ्रमण करत. त्यांना रिझर्व्ह बँकेकडे अर्ज करावा लागत नसे, परदेशी हुंडणावळीची जरूरी नसे नि पासपोर्ट, व्हिसा वगैरे बनवायला त्या वेळी मुळी कागदच नसावा. त्यांच्याप्रमाणं त्रैलोक्य-भ्रमणाचा योग मला लाभला नाही. बाकी एवढी मोठी महत्त्वाकांक्षा मी कधी बाळगली नव्हती हे माझं नशीब! आपलं या पृथ्वीतलावरच भरपूर भटकावंसं वाटतं! पाताळ नि स्वर्गलोकाचा विचार करू लागलो म्हणजे अंगाला घाम सुटतो नि माझ्या घशालाच नव्हे तर लेखणीलाही शोष पडू लागतो. उगाच खोटं कशाला सांगू!

नारदांचं उदाहरण गिरवून या जगाचा थोडाफार प्रवासही मी केला आहे. अनेक राजे, राण्या, लहानथोर मुत्सद्दी, राजकारणी पंडित, लेखक, कलाकार, पत्रकार वगैरेंच्या दरबारात व कित्येकांच्या अंत:पुरातही मी प्रवेश मिळविलेला आहे. कोणाचे कलह लावून देण्याचं कर्म कळीच्या नारदाप्रमाणं माझ्या हातून बहुधा घडलं नसावं! विद्वान् मंडळी म्हणतात की, एकंदर सात नारद होऊन गेले असले पाहिजेत. त्यातला एक नारद म्हणे पर्वत-ऋषींचा मामा होता. तर दुसरा म्हणे वसिष्ठपत्नी अरुंधतीचा भाऊ. कळीचा नारद म्हणून गाजणारा मुनी म्हणे एक गंधर्व होता. एक नारद म्हणे दासी-पुत्र होते अन् पुढं तेच ब्रह्मकुमार झाले

आपणा सर्वांना आवडणारे आपले नारद आपल्या मनाला नि मन:चक्षूंना पूर्ण परिचित आहेत. गगनाची दिशा दाखविणारी उंच शेंडी, गळ्यात पुष्पहार व यज्ञोपवीत, डाव्या हाती चिपळ्या व उजव्या हातात वीणा, पायी खडावा. अंगावर एकच एक शुभ्र वस्त्र. वाल्मीकी, शुक, व्यास, प्रल्हाद, ध्रुव, इत्यादींना भक्तिमार्ग शिकवायचं महान् कार्य नारद-मुनींनी केलं.

व्यासमहामुनींनी भागवतग्रंथाची रचना करून भारतीय वाङमयात थोर भर घातली. पण या ग्रंथलेखनास व्यासांना उद्युक्त केलं ते नारदांनी. यासंबंधीची कथा ऐकण्यासारखी आहे.

महाभारत हे विश्ववाङ्मयातलं केवढं अमोल रत्न! त्याची रचना व्यासांनी पूर्ण केली तरीही त्यांच्या चित्ताला काही समाधान लाभेना. एकदा ते उदास मनानं सरस्वतीच्या तीरावर बसले असता तिथं नारद आले.

"काय म्हणता व्यासमुनी? तब्येत ठीक नाही वाटतं?" नारदांनी विचारलं.

"नारदमुनी, माझ्या मनाला प्रसन्नता कशी ती लाभत नाही. मी नेहमीच उत्तम आचारविचारानं राहतो. आजपर्यंत योग्य प्रकारे गुरुसेवा केली. वेदांच्या आज्ञा पाळल्या, इतकंच काय पण महाभारतासारख्या ग्रंथाची रचना केली. पण तरीही माझ्या चित्ताला शांती लाभत नाही याला काय म्हणावं?" व्यास म्हणाले,

**त्वं पर्यटन्नर्क इव त्रिलोकीमंतश्चरो वायुरिवाऽऽत्मसाक्षी।**
**परावरे ब्रह्मणि धर्मतो व्रतैः स्नातस्य मे न्यूनमलं विचक्ष्व॥**

"हे मुनिवर्य, साऱ्या त्रैलोक्यात सूर्याप्रमाणं तुमचं सतत भ्रमण चालू असतं. तुम्हाला सर्व गोष्टी दिसतात. वायूप्रमाणं तुम्ही सर्वांच्या अंतरंगात संचार करता. मी योगाभ्यास करून निष्पाप झालो आहे, ब्रह्मज्ञान या विषयात मी निष्णात आहे. पण तरीही माझ्या मनाची तळमळ चालू असते. माझ्यात काहीतरी उणीव राहिली असली पाहिजे, तेवढी स्पष्ट करून सांगाल का?"

नारदमुनींना या प्रश्नाचं उत्तर माहीत होतं. ते चटकन् म्हणाले, "व्यासा, तुम्ही ज्ञानाचे डोंगर मिळविले नि मोठे ग्रंथ लिहिले हे सारं खरं, पण भगवंताच्या विमल यशाचं वर्णन मात्र तुम्ही केलं नाही!"

तेव्हा तुम्ही असं करा—

वाखाणावे प्रेमें भगवद्यश मुनिवरा तुवा आता।
चित्त प्रसन्न होते प्रभुच्या महिमाचि आदरें गाता॥

—मोरोपंत

नारदांचा हा उपदेश ऐकून मग व्यासमुनींनी भागवताची रचना केली. आणि भगवद्भक्तीची एक नवी खाणच जगाला प्राप्त झाली !

नारदमुनी हे स्वत ला भक्तिमार्गी समजतात. मी तर त्यांना एक अति-महान् कर्मयोगी असं मानतो भगवताची प्राप्ती करून घेण्याकरता नारदांनी फार मोठी तपश्चर्या केली. अनेक देश, शहर, अरण्य, पर्वत, रान उडवून ते एका निबिड अरण्यांत कित्येक वर्षे भगवंताचं ध्यान करत बसले होते. ही कठोर तपश्चर्या म्हणजे कर्मयोगच नव्हे का ? महाभारतासारख्या जवळजवळ एक लाख श्लोकांच्या महान् ग्रंथाचं लेखन करून शिणलेल्या व्यासांना भागवता-सारखा आणखी एक अतिसुंदर ग्रंथ लिहिण्याची प्रेरणा देणारे नारद हे स्वत कर्मयोगी होते एवढच नव्हे तर दुसऱ्याना कार्यप्रवृत्त करणारे कर्म-प्रेरक होते असं म्हणावंस मला वाटत.

ध्रुवाला अढळपद प्राप्त करून घेण्याचा मार्ग सांगितला तो नारदांनीच ध्रुवबाळाची गोष्ट आपणाला किती रसाळ वाटते लहान मुलांनी तर ती नेहमी ऐकावी. मातापित्यांनी, गुरूंनी ती त्यांना अवश्य ऐकवावी

/पालकाच्या हाती दिलेलं बालक हे राष्ट्राचं, विश्वाचं, मानवतेचं धन. त्याला जमलं शिक्षण द्यावं, वळण लावावं तशी त्याची घडण जडेल ।] राम, कृष्ण, अर्जुन, भीम, शंकराचार्य, ज्ञानेश्वरमहाराज, तुकाराम, शिवाजी-महाराज, रामदास, रामकृष्ण परमहंस, विवेकानंद–अशी विभूतिमालिका भारतानंच घडविली ही तेजस्वी परंपरा भारतात अखंडितपणानं चालायला नको का ?

बालपणी मुलांना काऊचिऊच्या गोष्टी अवश्य सांगा पण विसरू नका की या कळ्या आजच्या अणुयुगात उमलणार आहेत आज त्यांच्या शिरावरून हरघडी जेट् विमानं जात असतात, त्यांच्या डोळ्यांना जियतिथं आधुनिक शास्त्राचा संचार दिसत असतो त्यांच्या कानावर गोष्टी पडतात त्या स्पुटनिकच्या, अंतराळयानाच्या त्यात त्यांचा अर्थ कळू द्या त्यांना ध्रुवबाळाच्या दृढ-निश्चयाची गोष्ट सांगाच सांगा अन् आजच्या अंतराळवीराच्याही ! ही भारत भूमीची बाळं म्हणजे उद्यांच्या नव्या काळाची चाहूल आहे. तिचं स्वागत करा–मायेनं, आनंदानं, हौसेनं, जबाबदारीनं ।]



## — आम्ही बाळं भारतभूची !

( साभिनय संघनृत्य )

आम्ही वाळं भारतभूची, ग,
चाहूल नव्या काळाची ग!
कावळा–चिमणिला वरं का–
घर शेणामेणाचं का ?
बंगली बांधु सिमिटाची !
नको भातुकलीचा खेळ,
जातसे तयामधि वेळ !
हौस ग जेट् विमानाची !
भोंडल्यांचा आला कंटाळा,
घरु रिंगण ग अंतराळा !
लागली आस स्पुटनिकची !

फार फार पूर्वीची गोष्ट. एक आटपाट नगर होतं. त्या नगरीच्या राजाचं नाव उत्तानपाद. त्याला दोन बायका होत्या. कशा? कवि उद्धवचिद्धन म्हणतात, " रूपवंती तयास दोन जाया, कनिष्ठेशी अत्यंत प्रीतिमाया, पट्टराणीची पडो दे न छाया.'' मोठ्या बायकोचं नाव सुनीति, धाकटीचं नाव सुरुचि. अर्थातच धाकटीवर राजाचं अतिप्रेम. पाण्याप्रमाणं प्रीती ही वरून खाली वाहत असते. एखाद्या माणसानं दोन तीन किंवा चार पाच बायका केल्या तर त्याचं सर्वांत जास्त प्रेम कोणत्या बायकोवर असेल हे ओळखायचं कोष्टक कसं ठरलेलं असतं. द्विभार्याप्रतिबंधक कायदे आता आपण केलेले असल्यानं या कोष्टकांची किमया आताच्या तुमच्या आमच्या पिढीला कळणं तसं कठीणच.

सुनीतीला म्हणजे उत्तानपाद राजाच्या थोरल्या राणीला एक मुलगा होता त्याचं नाव ध्रुव. हा ध्रुवबाळ पाच वर्षांचा झाला तरी त्याला पित्याचं दर्शन काही झालेलं नव्हतं. धाकट्या राणीसाहेबांनी—सुरुचिदेवींनी—पतिदेवांना मनाई केली होती ना सवतीकडे जायची.

आपल्या बापाला पाहायची उत्सुकता लागून राहिली होती ध्रुवाला. एके दिवशी तो राजवाड्यात गेला. ध्रुवाचा सावत्र भाऊ उत्तम राजाच्या मांडीवर बसला होता. ध्रुवानं पित्याची दुसरी मांडी पटकावली. उत्तानपादराजा त्या दोन्हीही मुलांशी लाडीगोडी करू लागला. पित्याचं अंतःकरणच ते. कविकुलगुरु कालिदास म्हणतात,

"धन्यास्तदंगरजसा मलिनीभवन्ति !"

सुरुचीला ते दृश्य दिसलं नि तिच्या तळपायाची आग मस्तकात शिरली.

उचंबळे क्रोधाग्नि–शिरा ताठी । म्हणे, 'कवण बैसला राज-अंकी ॥
राज पैसा नेळवी कवनूनी । ध्रुव राजा होईल निश्चये की ' ॥

सुरुचीनं ध्रुवाला राजाच्या मांडीवरून ओढून दाणकन् जमिनीवर आदळलं. त्याच्यावर संतापानं ओरडून ती म्हणाली "चालता हो ! चोंबडे-पणानं राजपद मिळत नसतं. त्याकरता पूर्वपुण्याई लागते ! गतजन्मी देवाला व विसरला होतास ! आता या जन्मी तरी त्याची भक्ति कर !"

शरीराला लागलेल्या मारापेक्षा ध्रुवाच्या वर्मी बसलेला घाव अधिक वेदनादायक होता. तो रडत रडत माउलीकडे धावला. सुनीतीला त्यानं सर्व वृत्तांत सांगितला.

[ ध्रुव बोले, 'तो देव कसा आहे । असे कोठे तो सांग त्वरलाहे ॥
तया मागो अविनाश एक ठाय । पद मागो नव्हती दुजी माय ॥

ध्रुवानं निश्चय केला, आता असं स्थान प्राप्त करून घ्यायचं की जेथून मला कुणीही उठवू शकणार नाही. त्यानं मातेच्या ममतेचे पाश तोडले, राज्याचा लोभ लाथाडला, मनी इर्ष्या धरली अढळपदप्राप्तीची ! ध्रुव निघाला.

सुनीतीला पुत्रविरह असह्य झाला. उत्तानपाद राजाही ध्रुवाच्या मागून धावू लागला. राजानं आश्वासनं द्यायला सुरुवात केली.

"नको जाऊ देईन एक गाव' । ध्रुव बोले, 'देईल देव-राव' ॥
'पाच गाव दीधले फीर आता' । ध्रुव बोले, 'मागेन जगन्नाथा' ॥
राय बोले, 'देईन एक देश' । ध्रुव बोले, 'देईल जगदीश' ॥
'अर्ध राज्य दीधले आण तूझी' । ध्रुव बोले, 'देवास लाज माझी'॥

'सर्व राज्य दीधले फीर मागे'। ध्रुव बोले 'देईजे रमा-रंगे'।
'स्नेह का रे सांडिला ध्रुवा आजि। काळ-तोंडा जाहलो जगामाजी'॥
ध्रुव बोले, पितयास 'तात देवा। आता येतो मी लोभ असो द्यावा'।
हरी-भक्तीचा डौल कसा देही। अनू-तापे कोंदल्या दिशा दाही॥

कृतनिश्चयापासून ढळणारा तो 'ध्रुव' कसला? वाटेत त्याला नारदमुनी भेटले. अढळपद प्राप्त करून घेण्याचा त्याचा निश्चय पाहून नारदांनी त्याला मार्गदर्शन केलं व "ॐ नमो भगवते वासुदेवाय" हा बारा अक्षरी मंत्र शिकविला. अखंड तपश्चर्या करून त्यानं देवाला प्रसन्न करून घेतलं नि एकच वर मागितला,

ध्रुव बोले, "मज भक्ति सदा देई। पद दीजे नुठवी तुजी आई!"

देवानं त्याला ध्रुवपदच देऊन टाकलं!

ध्रुवाख्यानाला खरं माना वा प्रतीकात्मक माना, आजच्या तरुण पिढीला त्यापासून पुष्कळच शिकता येईल. मला पुष्कळ तरुण विद्यार्थी, विद्यार्थिनी भेटतात. त्यांना परदेशी जाऊन उच्च शिक्षण घ्यायची इच्छा असते. "पैसा नाही!" ही त्यांची वरवर दिसणारी अडचण ही एक सबब असते हे मला बऱ्याचशा अनुभवानं कळून चुकलं आहे. जर्मनीत काम करून पैसे मिळवायला व नंतर विद्यार्जन करायला एक भारतीय विद्यार्थी तयार होता. त्याची भीड पडली म्हणून मी त्याला एका कारखान्यात नोकरी मिळवून दिली. तासाला ४ रुपये पगार! कंपनीकडून आलेल्या पत्रात होतं, "आम्ही तुम्हाला 'अकुशल कामगार' (Unskilled worker) म्हणून प्रथम घेऊ!"

कामगार व त्यातही अकुशल हे शब्द वाचल्याबरोबर हा विद्यार्थी चिघरला, त्याला अपमान वाटला! तो अजून भारतातच आहे. दोन वर्षांपूर्वी त्याचं लग्नही झालं. संसारातलं त्याचं काम व कौशल्य प्रत्यंतराला येत आहे. त्याच्या, मरल्या, पाळणा, दुसऱ्यांदा हलत आहे म्हणे!

कोल्हापुराहून बडोद्याला बदली झाली तर नोकरीच सोडून देणारा वीर मला भेटला आहे. पुण्याच्या कन्येला अहमदाबादचा वर चांगला चालून आला होता, तर ती म्हणते, "जास्तीत जास्त मुंबईला राहणारं 'स्थळ' चालेल मला. शक्य तो सदाशिव पेठ, डेक्कन जिमखाना हा भागच बरा बाई!"

जिद्द, ईर्षा, महत्त्वाकांक्षा, धाडस इत्यादि सद्गुण आमच्या अंगी केव्हा येणार! घ्यवानें दाखवून दिलेला दृढनिश्चयाचा धडा माहीत आहे सर्वांनाच; पण तो फारच थोड्यांच्या आचरणात येतो. इंग्रजीत एक म्हण आहे, "There is always room at the top!" उच्च पदावर नेहमी रिकामी जागा असते!

पण आम्हाला उच्चपद हवं असतं कुठं? अन् हवं असलं तर ते श्रमाविना, तपश्चर्येशिवाय! सरकारी नोकरी बरी. एकदा 'पर्मनंट' झाल्यावर मग पेन्शनचीही खात्री. इकडचा कागद तिकडे हलवला की झालं काम, बाकी सारा आरामच आराम. शिक्षकाचं काम तर अत्युत्तम असं समजलं जातं म्हणे! शाळामास्तर, पोस्टमास्तर, नि स्टेशनमास्तर ही 'मास्तरत्रयी' बहुविध वैशिष्ट्यांबद्दल प्रसिद्ध आहेच. या मंडळींना नाना प्रकारच्या सुट्या किंवा रजा पुष्कळ मिळतात असा प्रवाद आहे. खरं म्हणजे विद्यादानाचं कार्य किती पवित्र! आमची संस्कृति सांगते :

> गुरुर्ब्रह्मा, गुरुर्विष्णुः गुरुर्देवो महेश्वरः ।
> गुरुः साक्षात् परब्रह्म, तस्मै श्रीगुरवे नमः ॥

अहंऽ, शिक्षणकार्य हे पवित्र म्हणून शिक्षकाची नोकरी चांगली समजायची नाही म्हणे आजकाल, तर खूप सुट्या मिळतात ना, म्हणून! खरंच, आमच्या देशात जेवढ्या सुट्या घेतल्या जातात तेवढ्या जगात कुठंही घेतल्या जात नसतील.

भारत हा परधर्मसहिष्णु देश आहे, तेव्हा प्रत्येक धर्माच्या सणासुदीला काम बंद! थोरमोठ्या वीरपुरुषांच्या जयंतीचा सुंठवडा खायला नि त्यांच्या श्राद्धदिनाचे पिंड शिववायला सवड हवी म्हणून कारखान्याला टाळा! एकादशी, शिवरात्र, गणेशचतुर्थी, दसरा, दिवाळी इत्यादि सण आमच्या पंचांगात एका वेळी येत असले तर ते तुमच्या पंचांगात येतात दुसऱ्याच वेळी! ठीक आहे, साऱ्याच पंचांगांतल्या सर्वच सुट्या भोगून टाकू म्हणजे झालं. कौटुंबिक स्वरूपाच्या समारंभाकरता रजा घ्यायला नको का? कोणाची पन्नाशी किंवा साठी उलटली तर त्या मेजवानीला जाणं अवश्यच. जावळाला, मुंजीला, लग्नाला, लग्नानंतर व्हायच्या 'अत्यावश्यक धर्मसंस्काराला,' बारशाला रजा तर पाहिजेच पाहिजे.

सुट्टीच्या मस्तीतच आम्हाला सुखाची ऊब मिळते, सुट्टीशी गट्टी करून आम्ही पगार खातो, सुट्टी मिळविण्यातच आमची मति चालते, सुट्टीशिवाय आम्हाला गति नाही! आमची मोक्षप्राप्ती सामावलेली असते ती सुट्टीतच!

★

## - सुट्टी पडली, चंगळ झाली!

अहाहा! वाहवा! द्यावी टाळी!
सुट्टी पडली! चंगळ झाली!!!

कधी "सफाई," कधी ग्रामदिन,
कधी वृक्षदिन, कधी बचतदिन,
आज बालदिन, उद्या नियोजन!
मंत्री आले! बांधा फायलि!

निमंत्रिले हो दिल्लीश्वरना,
पायाभरणी! फीतकर्तना,
उद्घाटाया बीजयोजना!
धरणच फुटले, गंगा आली!

मतदानाला हवीच सुट्टी,
ती 'बाहेरी'! हफिसा बुट्टी,
सुट्टी! नेते गेले वरती!
विसर्जनाला रक्षा सजली!

कुणि जन्मो वा, मरो, रडो वा,
हरदिन लाभो सुट्टी-मेवा,
बढती वाढो, टी. ए. खावा,
कामावाचुनि पेन्शन घडली!

प्रभुवाला सुट्टीची सुखासीनता नको होती. त्यानं राज्यावरही पाणी सोडलं ते त्याहून श्रेष्ठ अशा ध्येयाच्या सिद्धीसाठी! शारदमुनि हे अलौकिक

गुरू त्याला भेटले, त्यांनी ध्रुवाला एकच मार्ग सांगितला अखंड श्रमाचा, शरीरकष्टाचा, मनस्तापाचा, तपस्येचा! सद्गुरूला सच्छिष्य मिळाला सच्छिष्याचं लक्षण सांगताना श्रीसमर्थ म्हणतात,

मुख्य सच्छिष्याचे लक्षण। सद्गुरुवचनीं विश्वास पूर्ण। अनन्यभावें शरण। त्या नांव सच्छिष्य॥ शिष्य पाहिजे सात्विकाचा। शिष्य पाहिजे दृढव्रताचा। शिष्य पाहिजे उत्तम कुळीचा। पुण्यशीळ॥

!कुठे तो ध्रुवशिष्य नि कुठे आजचे विद्यार्थी! आजकाल शाळाकॉलेजला जाणारे बहुसंख्य विद्यार्थी काय शिकतात? त्यांना पहिला धडा पढविला जातो मिथ्याचरणाचा लाखो रुपयांचं खर्च उपन्न होऊन त्यानंच बसविण्या-करता खोटे दाखले कसे पैदा करावे याचा श्रीगणेशा त्याला प्रथम पालकच देतात एवढीशी फी बुडविण्याकरता अमोघ चातुर्यानं वाचविलेला हा पैसा म्हणे "स्पेशल क्लासेस" कडे कामी येतो! सध्या, आमचं डोकं हे असं चाललं खरं की नाही? हजेरी शाळेत नि 'अभ्यास' क्लासात म्हणे! शाळेत दंगल अन् क्लासात मंगल होणार यात!

गुरुजींना 'धडा शिकवण्यासाठी' आजकालचे विद्यार्थी बद्धपरिकर! 'मुलीं'च्या जाण्यायेण्याच्या वाटा त्यांना तोंडपाठ. त्यांची आचरट चेष्टा करण्याचा नित्यपाठ कधी चुकायचा नाही नटनटींच्या आवडीनिवडींच्या गाथा त्यांना मुखोद्गत! 'पेपर' कठीण काढला म्हणून संप अथवा टपास करून दंगल उडविण्याची कलाही त्याच्या अंगी मुरलेली गल्लीबोळात गाठून गुरूला 'प्रसाद' देणाऱ्या शिष्याच्याही गोष्टी मी ऐकल्या आहेत

गुरूही आपल्या परीनं जे अनेक ढंग करतात त्याचे रंग शिष्यांना पुरेपूर परिचित असतात. शाळांना मिळणारं सरकारी अनुदान वाढवून मिळावी निदान कायम राहावी याकरता अनेक शिक्षक ज्या विविध हिकमती लढवितात त्या वठवून घ्यायच्या असतात शेवटी शिष्यांकडूनच गुरूच्या तोंडावर तंबाखूच्या धुराची काळोखी सोडायला शिष्यांनी तरी का भ्यावं? आजचे कित्येक गुरू शिष्याकरवीच तर बिड्या-सिगरेट्स् आणवतात ना! असल्या गुरूंना समर्थांनी हाणलेला हा टोला ऐका!

शिष्यासी न लाविती साधन। न करविती इंद्रियदमन। ऐसे गुरु अडक्याचे तीन। मिळाले तरी त्यागावे॥

चंद्रमंगळावर अधिष्ठान ठेवण्याकरता धडपडणाऱ्या शिष्यांना मार्गदर्शन करणारे काही गुरुवर्य आजही जगात आहेत. धन्य त्यांची! अढळ ध्रुवपदाचा मार्ग दाखवणारे नारद होऊन गेले कित्येक शतकांपूर्वी. असे गुरु आज आम्हाला हवेत!

जयति जयति माया यस्य काया धरास्ते ।
भुवनचरमनेकं केवलं चाकलय्य ॥
ध्रुवपदमपि यातो यत्कृपातो ध्रुवोऽयं ।
सकलकुशलपात्रं ब्रम्हपुत्रं नतोस्मि ॥

—अर्घ्य : ३ —

★

## सुविचार

विद्यया शस्यते लोके पूज्यते चोत्तमैः सदा ।
विद्याहीनो नरः प्राज्ञः सभायां नैव शोभते ॥

विद्या मित्रं प्रवासेषु भार्या मित्रं गृहेषु च ।
व्याधितस्यौषधं मित्रं धर्मो मित्रं मृतस्य च ॥

—माघ

मना श्रेष्ठ धारिष्ट जीवी धरावें ।
मना बोलणें नीत सोशीत जावे ॥
स्वयें सर्वदा नम्र वाचे वदावे ।
मना सर्व लोकांस रे नीववावे ॥

क्रियेवीण नानापरी बोलिजेते ।
परी चित्त दुश्चित्त ते लाजवीते ॥
मना कल्पना धीट सैराट धांवे ।
तया मानवा देव कैसेनि पावे ?

पदीने पदी सार्थकाची करावी ।
सदा संगती सज्जनाची धरावी ॥

—समर्थ रामदास

# प्रेम करा आणि विद्या मिळवा !

धनसंपन्न माणसावर किंवा रूपवान स्त्रीवर पुष्कळदा अकारण संकटं येतात. श्रीमंती आणि सौंदर्य बाळगणं हाच त्यांचा गुन्हा ठरतो त्यांनी स्वसंरक्षणाची सिद्धता अहोरात्र ठेवलीच पाहिजे. भारतमाता स्वतः निरुपद्रवी खरी पण सर्वांगसुंदर सुवर्णभूमि अशी तिची ख्याति प्राचीन कालापासूनची. आमच्या देशावर नेहमीच जी परचक्रं येतात त्यांचं कारण हेच. आम्ही स्वतः तटस्थ राहायचा मंत्र जपला तरी तो मंत्रयज्ञ निर्विघ्न पार पाडू द्यायचा नाही असा पण जर शेजारच्या शत्रुराष्ट्रांनी केला असेल तर? देवादिकांच्याच गोष्टी बघा ना! हिरण्यकश्यपूनं अति उग्र तप करून देवाकडून वर मागून घेतला,

नांतर्बहिर्दिवा नक्तमन्यस्मादपि चायुधैः ।
न भूमौ नाम्बरे मृत्युर्नरैरपि मृगैरपि ॥

हे देवा, मला मृत्यू घरात किंवा घराबाहेर नसावा. रात्री आणि दिवसाही नसावा. तू उत्पन्न केलेल्या सृष्टीपासून अथवा एखाद्या शस्त्रानं, मनुष्याकरवी अथवा पशूकडूनही माझा वध होऊ नये. मला पृथ्वीवर अथवा आकाशातही मृत्यू भेटू नये!

परमेश्वराबरोबर दैत्यानं केलेला हा पंचशील करारनामा. दुष्टबुद्धि दैत्यांची अपेक्षा अर्थातच अशी की हा करार फक्त परमेश्वरावर बंधनकारक; आपण आता त्याची हड्डी नरम करायला काय हरकत आहे? देवांना वाटलं, आपण ज्या हिरण्यकश्यपूला एवढं मोठं दान मानपत्रासह दिलं तो आपणांशी कृतघ्न कसा होईल? देवांना देखील क्षणभर विसर पडला की,

उपकारोऽपि नीचानामपकारो हि जायते ।
पयःपानं भुजंगानां केवलं विषवर्धनम् ॥

हिरण्यकश्यपू सापाप्रमाणं उपकारकर्त्यावरच उलटला. साधुसंतांचा छळ

करायला सुरुवात केली, देवांनाच बंदीत टाकायची तयारी केली त्यानं ! असं उलटलं हे पंचशील. कलियुगात भारताच्या अंगाशी एकदा आलं होतं ना तसंच !

हिरण्यकश्यपूनं कमालीचा मुत्सद्दीपणा लढवून असा करारनामा करून घेतला, की त्यामुळं देव निःशस्त्र ठरले, हिरण्यकश्यपूला अमरत्व प्राप्त झालं. देवांनी आपल्या हातानं आपल्या गळ्याला लावायचा फास त्या राक्षसाच्या हाती दिला अन् त्यानं तो करकचून आवळायला सुरुवात केल्यानंतर मग देवांचे डोळे उघडले. आता काय करायचं ?

मग भगवान् विष्णूंनी कायद्याची काटेकोर दृष्टी वापरून त्या करारांतून सुटायची शक्कल लढवली. त्यांनी नरसिंहाचा अवतार घेतला. नरसिंह धड पशूही नव्हे अन् मानवही नव्हे ! नरसिंहानं हिरण्यकश्यपूचा कोथळा बाहेर काढला तो नखं वापरून, कारण शस्त्र वापरायचं नाही असं ठरवलं होतं ना. विष्णूंनी या दानवाचा वध केला तो सायंकाळी, उंबरठ्यावर बसून नि त्या कृतघ्न राक्षसाला मांडीवर घेऊन ! करारांतली सारी कलमं पाळून शत्रूचा निकाल लावण्याकरता देवांना देखील नव्या नखशस्त्राचा शोध लावावा लागला, एक विलक्षण अवतार घ्यावा लागला !

युद्धाच्या निमित्तानंच केवढे तरी मोठमोठे शोध लागत आले आहेत. देवांच्या राज्यात जे झालं तेच मानवी इतिहासात घडत आलं आहे. दारूगोळ्यापासून तो आजच्या अणुबाँबपर्यंतची कितीतरी संशोधनं रणांगणं जिंकण्यासाठीच झाली. चंद्रमंगळावर स्वारी करण्याकरता म्हणून आता रॅकिट्स, स्पुटनिक नि वेगवेगळया नावांची अंतराळयानं ग्रहनक्षत्रांशी स्पर्धा करत आहेत. या स्पर्धेतून नवी महायुद्धं तर उद्भवणार नाहीत ना ! उद्भवलीच तर पुढची युद्धक्षेत्रं चंद्रमंगळावरचीच निवडली जावीत. तेवढं अशुभ जरा दूर तरी घडेल.

देवादिकांच्या कथा मनमोकळेपणानं सांगता येतात. त्यामुळं माझ्यासारख्या कीर्तनकाराची चांगली सोय होते. देव काही खुलासे, प्रतिखुलासे, निषेध करत नाहीत किंवा अब्रुनुकसानीचे खटले आमच्यावर करत नाहीत. त्यांचे काही आणीबाणीचे अथवा संरक्षणाचे कायदे असले तर त्यांची अंमलबजावणी व्हायची तीही मं–त–र ! चित्रगुप्ताच्या वहीतील नोंदी सांपडतील तेव्हांची ती गोष्ट

गोष्ट जुनीच आहे अन् देवादिकांचीच. एकदा देवांचं नि दैत्यांचं एक घनघोर युद्ध माजलं अन् देवांचा सतत पाडाव होऊ लागला. देवांचे योद्धे मेले म्हणजे मरूनच पडत. दैत्यांचे मेलेले सैनिक मात्र पुन्हा जिवंत होऊन संग्रामात दुप्पट बळानं भाग घेत. कारण दैत्यांचे गुरु शुक्राचार्य यांच्याजवळ संजीवनी-विद्या होती. मंत्राच्या सामर्थ्यानं ते दानवसैन्याला जीवदान देत. देवांना ही विद्या अवगत नसल्यानं साहजिकच त्यांचं सैन्य-बळ खचूं लागलं नि त्यांना लागोपाठ पराभवाचे तडाखे खावे लागले.

संकट आलं म्हणजे त्यातून सुटण्याच्या नवनव्या युक्त्या माणसालाही सुचतात, मग देवांचं काय ! शुक्राचार्यांजवळची संजीवनी-विद्या या ना त्या उपायानं हस्तगत केली पाहिजे असं शेवटी देवांनी ठरविलं. चौर्यकर्म म्हणता ? युद्धात आणि प्रणयात सारं काही माफ असतं म्हणे ! युद्धशास्त्रांत नीति एकच असते : शत्रू तो शत्रू, त्याला कोणत्याही साधनानं धुळीला मिळवणं हा युद्धनीतीचला पहिला पाठ !

देवांनी ठरविलं की दैत्यांजवळची ही विद्या पैदा करण्याकरता कोणातरी चतुर हेराची शत्रुपक्षात पाठवणी केली पाहिजे.

> ती विद्या साधाया देवांनी सद्विचार आठविला,
> शुक्राकडे स्वगुरु-सुत कच विनवुनि युक्ति वदुनि पाठविला !
>
> —मोरोपंत

देवांचा गुरु बृहस्पति. त्याच्या पुत्राला म्हणजे कचालाच शुक्राचार्यांकडे पाठवावं असं एकमतानं ठरलं ! कचाला सर्व प्रकारचं शिक्षण देण्यात आलं. कसं बोलावं, कसं चालावं, कसं वागावं, शत्रूच्या पोटात शिरून त्याची विद्या कशी मिळवावी, कोणत्याही मोहात कसं गुरफटून जाऊं नये वगैरे सर्व गोष्टी कचाला पढविण्यात आल्या ! दैत्यगुरूची सेवा करण्याच्या मिषानं देवगुरूचा पुत्र निघाला ! केवढा धोका होता त्याला, केवढी जबाबदारी होती त्याच्यावर. वाघाच्या जबड्यातच हात घालायला तो निघाला होता !

हेरगिरीचं काम हे असंच धोक्याचं असतं. सीतेचा शोध घ्यायला निघालेला हनुमान काय किंवा विजापुरकर, मोगल यांच्या दरबारांतली बित्तंबातमी शिवाजी महाराजांना आणून देणारा बहिर्जी काय, सारे प्राणावर उदार

होऊनच गुप्तचराची कामगिरी करत. एका राष्ट्राची अणुविषयक किंवा इतर शास्त्रीय संशोधनं दुसऱ्या राष्ट्रांना पुरविणारा हेर सापडला तर त्याला विजेच्या खुर्चीवर, बंदुकीच्या तोंडी किंवा फासावरून यमसदनीच पाठविलं जातं आजदेखील.

कच शुक्राचार्यांसमोर उभा राहिला नि म्हणाला, "हे गुरुवर्य, मला आपली सेवा करायची इच्छा आहे!"

"अरे, पण तू देवांच्या गुरूंचा, बृहस्पतीचा मुलगा आहेस; तू तर शत्रुपक्षातला! तुला कसं घरी ठेवून घ्यायचं?" शुक्राचार्यांनी शंका विचारली.

हेरगिरीत खरं बोलायचं असतं? आपल्या प्राणावर उठलेल्या शत्रूचा कंठ चिरायच्या योजनांत नीतीअनीतीचं सव्यापसव्य मांडायचं असतं?

साळसूदपणाचा आव आणून कच म्हणाला, "गुरुवर्य, माझं आणि माझ्या बापाचं पटत नाही!" अलीकडे वर्तमानपत्रांत जाहिराती येतात त्या ठेक्यात त्यानं बहुधा असं सांगितलं असावं, "देव नावाच्या वाईट लोकांच्या संगतीनं माझा बाप बिघडला आहे. त्याचा माझा काही संबंध नाही, आम्ही विभक्त झालो आहो. सर्वांना जाहीर व्हावं!"

गोड भाषा आणि विनम्र वागणं या गुणांच्या जोरावर त्यानं शुक्राचार्यांवर छाप पाडली. गुरुकन्येवर तर त्यानं जणू मोहजाल टाकलं. होय. शुक्राचार्यांना एक अतिसुंदर, तरुण, प्रेमळ कन्या होती. तिचं नांव देवयानी. आपल्या सफाईदार, सभ्य नि सुसंस्कृत वर्तनानं त्यानं तिचं हृदय जिंकलं. देवयानी कलासक्त होती. तिला नृत्यसंगीत प्रिय होतं. अभ्यास व गुरुगृहीची कामं सांभाळून कच त्या युवतीला त्या कलांचं शिक्षण देऊं लागला. ती त्याच्यावर पुरती भाळून गेली. नृत्याच्या पदन्यासाला तिच्या हृदयातल्या प्रणयस्पंदनाची साथ! संगीतातल्या तानांशी जमू लागला तिच्या शरीरसंवेदनांचा ताल!

शुक्राचार्यांना तर असं वाटूं लागलं की बस्स, शिष्य असावा तर असा. तो त्यांच्या सेवेत रतिभरही चुकत नसे. त्यांच्या गायींना देखील तो प्यार झाला होता. चरायला जायचं तर कच बरोबर हवा असं त्या पशूंना देखील वाटायचं. कचाचा वेणुरव त्यांना मुग्ध करी, त्याचा करस्पर्श आपल्या पाठींना व्हावा म्हणून ते गोधन आसुसलेलं असे. शिष्याच्या या परमभक्तीवर शुक्राचार्य नितांत खूष होते!

दानवांतल्या हुशार लोकांना मात्र हळूहळू कचाच्या हेतूबद्दल साधार शंका येऊ लागली. नंतर तर त्यांची नक्की खात्री पटली की, विनयशील शिष्याचं सोंग घेऊन आलेला हा प्राणी नक्कीच देवांचा हेर, संजीवनी विद्या पळवून नेऊ इच्छिणारा चोरच असला पाहिजे. एके दिवशी गायींना चारायला घेऊन तो अरण्यात गेला असता त्याला काही दानवांनी ठार केलं नि त्याचं प्रेत दिलं पशूंना खाऊ घालून.

सांजवेळ झाली. गायी घरी आल्या. त्यांच्या गळ्यातल्या घंटांच्या मंजुळ आवाजानं देवयानीच्या चित्तवृत्ति फुलारल्या. गायींच्या पाठोपाठ यायचा कचाचा रोजचा परिपाठ होता ना! शुक्राचार्यांच्या चित्तालाही समाधान झालं. त्यांच्या संध्याकाळच्या अग्निहोत्रांत या शिष्यवराची पुष्कळ मदत होत असे त्यांना.

गाई गोठ्यात गेल्या नि शांत उभ्या राहिल्या. त्यांच्या मागोमाग येणारा देवयानीचा हृदयेश्वर आला नाही. शुक्राचार्यांच्या संध्येची पूर्व-तयारीही झाली नाही, कारण त्यांच्या शिष्योत्तमाचा पत्ताच नव्हता!

गाई गृहासि आल्या, मावळला रविहि, कच न आढळला।
तेव्हां सोडुनि धृति-नग शुक्र-सुता-बुद्धिभूमिला ढळला॥
—मोरोपंत

देवयानीचा धीर सुटला. मोरोपंत सांगतात, "शुक्रसुता गहिंवरली, न्हाणी तदुरस्थळासि अस्रु तिचे!" प्रियकराच्या विरहदुःखामुळं तिच्या डोळ्यांतून गळणाऱ्या अश्रूंनी तिच्या उरोभागाला स्नान घातलं. ती बापाला म्हणाली, "*कचाची नि माझी पुन्हा भेट घडवून द्या, नाहीतर मी प्राणत्याग करीन!*"

शुक्राचार्यांचं पितृहृदय लेकीकरता कळवळलं. त्यांनाही तो लाडका शिष्य हवा होताच. त्यांनी संजीवनी विद्येचा उपयोग केला. लांडग्यांची पोटं फाडून कच त्या पितापुत्रींच्या समोर येऊन उभा राहिला! हळू हळू देवयानी-कडून आपल्या पुनर्जन्माची कथा कचाला समजली, तशीच दैत्यांनाही समजली. गुरुकन्येकरता फुलं आणावी म्हणून तो एकदा बाहेर पडला नि पुन्हा दैत्यांच्या शस्त्रांना बळी पडला. या वेळी मात्र दैत्यांनी त्याच्या प्रेताची

खांडोळी खांडोळी करून ती नदीत फेकून दिली. पुन्हा देवयानीनं हट्ट धरला. शुक्राचार्यांनी संजीवनी वापरून कचाला दुसऱ्यांदा पुनर्जन्म दिला. लाडकी लेक कचावर अनुरक्त आहे हे त्यांनी कधीचं ओळखलं होतं. मनाशी ते म्हणत असावे, "काय दैवाचा खेळ असतो पाहा! खुद्द शत्रूच्या गुरूच्या पुत्रावर माझ्या कन्येचं प्रेम बसावं ना!"

प्रेमाचं हे सारं असंच असतं. कोणाचं प्रेम कुणावर का नि कसं बसलं याचं पृथःकरण करायला शास्त्रं असमर्थ असतात! प्रीतीपुढे कायदा कुमकुवत ठरतो, शस्त्रांची धार बोथट पडते, साम्राज्याचं सामर्थ्यही दुबळं बनतं. जिथं कधीही सूर्य मावळत नव्हता अशा साम्राज्यावरही एका स्त्रीच्या प्रेमाकरता लाथ मारणारा प्रेमवीर तर अगदी परवापरवाचा! पायी लोळण घेणाऱ्या राजैश्वर्याला मीराबाईनं तुच्छ मानलं, तिचं मन गेलं होतं गोपीवल्लभावर!

*

## — मनोमनी उमजली!

(केदार)

न कळे सांगुनि, नुमजे बोलुनि,
नयनी ती उमलली –
प्रीति ही मनोमनी उमजली!

गोरी कमलिनी, भृंगचि काळा–
त्याच्या गुंजनि कशी रंगली?
भोळा शंकर, क्रुद्ध भयंकर,
सुंदर गौरी तयास भुलली!

सागरि प्रेमा अलोट भरती,
दूर चंद्रिका जरी चमकली!
राजसंपदा, सुंदर पतिला,
त्यजुनी मीरा प्रभुपदि रमली!

पुन्हा एकदा घोटाळा झाला, अनर्थ ओढवला. राक्षसांनी तिसऱ्यांदा कचाला मारलं. या वेळी मात्र राक्षसांनी कमानीचं डोकं लढवलं. त्यांनी कचाच्या प्रेताचं पीठ करून ते जाळलं आणि ती राख सुरेच्या पेल्यात घातली. अन् ती मदिरा त्यांनी शुक्राचार्यांनाच प्यायला देऊन कचाचा पुरता बंदोबस्त करून टाकला. आजकाल भारताला आलेले परके हेर खुद्दाल राजधानीतल्या विमानतळावरून स्वतःच्या विमानांनं आरामात निघून जातात. तसं दैत्यराज्यातसुद्धा चालत नसे पूर्वी. नाहीतर कचाला तीनदा कशाला मरावं लागलं असतं !

बस्स ! शुक्राचार्यांच्याच पोटात गाडून टाकलेल्या कचाचा आता पुरता निकाल लागला असं समजून राक्षस आनंदित झाले, निर्भय झाले. पण कच होता देवांचा हेर. शहाणासुरता, शिकलासवरलेला, हेरगिरीत पक्का मुरलेला. त्यानं एक नामी चौर्यकर्म कधीच केलेलं होतं. त्यानं चोरलं होतं देवयानीचं हृदय ! ती कामिनी कचाचा अभिलाष करत होती. तिच्या प्रणयाचा काठोकाठ भरलेला कुंभ प्रीतीदेवावर करायच्या अभिषेका-साठी कधीपासून सिद्ध होता, आतुर होता पण पुन्हा एकदा ती त्या प्रियदर्शनाला मुकली.

देवयानीनं पित्याजवळ आकांत मांडला. "बाबा, माझा कच मला द्या ! त्याच्याशिवाय माझं जीवन व्यर्थ आहे. मला कच हवा. तो दिसला नाही तर मी प्राण देईन !"

लाडकी लेक झाली म्हणून तिचे तेच तेच लाड पुरवायचे तरी कितीदा ? शुक्राचार्य वैतागून गेले

> शुक्र म्हणे वत्से मी वांचवितो परि पुनः पुन्हा मरतो ।
> आग्रह करुनि म्हणसी, 'प्रेत गति-गतहि कच पुन्हा परतो' ॥

देवयानीनं अगदी हट्टच धरला तेव्हा पुन्हा एकदा संजीवनी—मंत्र योजून आचार्य म्हणाले, "वत्सा, कचा ! ये !"

"ओ" आचार्यांच्या पोटातून कचानं उत्तर दिलं, "मी आपल्या पवित्र उदरात अगदी आनंदात आहे, गुरुमहाराज !"

गुरुजींच्या पोटात गोळा उठला. त्यांच्या डोळ्यांना क्षणभर अंधारी

आली नि मग त्यांचे डोळे पुरते उघडले. दारूचा प्रताप वरं! मद्यात कसलाही पदार्थ मिसळला तरी चालतं हे गटारगंगेचं तीर्थ पिणाऱ्या कलियुगीन मदिराभक्तांना माहीत आहेच. गावठी दारूत जो मालमसाला घालतात त्याची यादी मला एकदा परवा ऐकायला मिळाली नि प्रथम माझं पोट ढवळूं लागलं, डोळ्यापुढे काजवे चमकले, नंतर अंगाला घाम सुटला, आणि मग घेरी यायला लागली. ही यादी सांगू म्हणता? पण नकोच. माझ्या सज्जन श्रोत्यांनी इथं बेशुद्ध पडावं अशी माझी इच्छा नाही!

दारूत प्रेताची राख मिसळली होती; दैत्यांनी आणि त्या ज्ञानी गुरूनं ती खुशाल ढोसली होती! आजचे मदिराकार असली मिश्रणकला या दैत्यांपासूनच शिकले की काय कोण जाणे! दारूचे दुष्परिणाम शुक्राचार्यांना कळायला इतका प्रकार व्हायला लागला. कचाची राख त्यांच्या पोटातनं बोलू लागली. वा! आजकाल जर असं काही घडलं तर 'पिणाऱ्यां'च्या पोटातून माणसंच काय पण सूकरासारखी अभद्र जनावरं देखील ओरडूं लागतील, नाही का? अहो, वेगवेगळ्या वनस्पति, देशीपरदेशी खतं, नवसागर, रुईचा चीक, अमोनियम सल्फेट यासारखे पदार्थही पोटात गुरगुरू लागतील. एक नवीनच रौद्र संगीत ऐकायला मिळेल बाकी आपणाला.

स्वतःच्या पोटावरच बेतल्यावर मग त्या वृद्ध शुक्राचार्यांना सद्विचार सुचला. त्यांची शापवाणी कडाडली,

"जो विप्र आजपासुनि मद्यप्राशन करील तो पापी।
ब्रह्म-घ्न-सम निश्चित," असि मर्यादा स्वये कवि स्थापी॥

करून करून भागली नि देवपूजेला लागली, असं म्हणतात ना

संजीवनीमंत्राने जिवंत झालेला कच गुरूचं पोट फाडून बाहेर येऊं शकला असता. लांडग्यांच्या शरीरांतून तो आला नव्हता? पण गुरु मेले असते ना! त्याला गुरूपासून अजून मंत्रविद्या शिकायची होती. म्हणून तो लबाड गोड भाषेत म्हणतो कसा,

"निर्भय बसेन काल क्रमुनि पवित्रोदरीं असाचि सुखें।
न हित गुरुदर–दारण निघतां मज निंदतील साधु–मुखें"

आता आली का पंचाईत? लेकीकरतां कचाला पोटाबाहेर काढावा तर स्वतःचं मरण ओढवणार!

*गुरु म्हणे, 'वत्से, कच कुक्षि विदारुनि निघेल बाहेर।*
*हा तरणार, परि तुझे या कुव्यसनीं बुडेल माहेर!'॥*

बापाला मारून, माहेर बुडवून देवयानीला कसलं सुख मिळणार! ती म्हणाली, "वदता हें अशुभ काय हो तात? व्हावे दोघेहि मला!" तिला प्रियकरही हवा नि पिताही हवा! कचालाही तेच हवं होत. कारण त्यामुळच तर संजीवनी–विद्या त्याच्या पदरात आपोआप येऊन पडणार होती.

देवयानीनं अश्रूंचा पूर वाहविला तिचा शोक पाहून त्या वृद्ध पित्याचं कोमल अंत:करण कळवळलं, हळहळलं, तळमळलं. कन्येला पिताही हवा नि प्रियकरही. मोठाच पेच होता तो पण कन्याप्रेमान जिंकली.

शुक्राचार्य कचाला म्हणाले, "प्रिय शिष्योत्तमा, मी आता तुला संजीवनीविद्या शिकवितो. सारे मंत्र चांगले मुखोद्गत कर. मग माझं पोट फाडून बाहेर ये नि त्या विद्येच्या बळावर मलाही प्राणदान दे!"

गुरूच्या पोटात वसलेल्या कचाच्या पोटात हर्ष मावला नसेल. त्याला झालेल्या आनंदाच्या गुदगुल्यामुळ शुक्राचार्यांचं पोटही कदाचित दुखल असावं, त्यांना मात्र वाटल असेल, कचाला बाहेर यायची घाई झालीय्. अर्थात् त्याला जरूर घाई झाली होती अन् तो गुरुजींच्या उदरातून संजीवनीमंत्राची पारायण करत बाहेर पडलाही! शिष्यान आपल वचन पाळून गुरूला जीवदान दिल, गुरूची विद्या गुरूलाही फळली ती अशी. देवांना ही बातमी आणखी कोणातरी गुप्तचराकडून कळली. सुरा आणि अमृत होमून ते देवतांबरोबर, अप्सरांसंगे नाचू लागले. गंधर्वकिंनराच्या गाण्यावजावण्याला रंगत भरली. आनंदाला हर्ष झाला, गायनावर ताना उमलल्या, सुरेला नशा चढली! देवांना संजीवनीशास्त्राची किल्ली सापडली होती! त्यांचा उल्हास स्वर्गात मावेना!

शिष्यान घडविलेल्या आपल्या पुनर्जन्मावर गुरु प्रसन्न, प्रियकर नि पिता यांच्या पुनर्दर्शनामुळ देवयानी प्रफुल्लित, तर संजीवनीविद्या जिंकल्याचा कचाला यशोन्माद!

दैत्यांची दैवगती मात्र लवकरच भंगणार होती.

देवयानीची प्रीतिवेल कचीपासून बहरली होती. त्या कमनीय तनुलतिकेच्या रोमरोमांवर प्रणयकलिका नटूनथटून बसल्या होत्या—लाजून, मुरकून, तोंडावर पदर घेऊन! हळूहळू पदर बाजूला गेला, कळ्या उमलल्या, प्रीतिफुलं हसू लागली, त्यांचा मधुर सुगंध आसमंतात दरवळूं लागला. देवयानीच्या प्रेमपूर्तीचा मंगल समय जवळ आला होता. मदनज्वरानं विव्हळ झालेल्या त्या विदुषीला स्त्रीसुलभ विनयाचाही विसर पडला. उसळत्या यौवनाच्या उन्मादात तिनं विनविलं,

शुक्रसुता तव कहत विनयसे बिनती सुनो हमारी।
मेरे मनकी बात करो अब दासी भई तुमारी॥

★

## — प्रेमकुंभ मम अमाप भरला!

( मालकंस )

प्रेमकुंभ मम अमाप भरला—
सांडे काठोकाठ,
सजणा, दे तव हृदयी वाट!

तूं शत्रूचा दूत राजसा,
मन्मनिचा सम्राट्!
कर्तव्यावरि केली, माझ्या
प्रीतीने रे मात!

पुनर्जन्म तुज तीन! मजमुळे—
संजीवनी मुखात!
विद्येसह ने मजहि जीवनी—
सजवूं अंतरपाट!

मीलनविव्हल मी नवबाला,
तुझ्याविना ना चैन मनाला!
हृदयहरण केलेस सुंदरा—
तनमनिचा हो नाथ!

कचाला आश्चर्याचा, विस्मयाचा धक्का बसला. म्हणजे तनं नाटक केलं त्यान, कारण देवयानीच्या मनातला प्रश्न त्यान कधीपासून अपेक्षिला होता. तो म्हणाला,

त्या उदरी वस तुझा तेथे माझाहि हे असे नाते ।
देवि करग्रहण करू समत धर्माचि जे असेना ते ॥

" देवयानी, तुझ्या पित्याच्या पोटी मी आताच जन्मलो नाही का ? तेव्हा आपण भाऊबहीण झालो. तू आता माझी लाडकी ताई झालीस. तुझ्याशी लग्न करण पाप ठरणार नाही का ? "



## — मी दादा, तूं ताई !

मी दादा, तू ताई !
नाते अपुले लोभस, सुंदर !

बहीण विदुषी, प्रेमळ ललना,
सौदामिनि जणु उजळी गगना,
भाउबिजेची साग कामना !
बंधुभगिनिचा बंध मनोहर !

प्रेमपूर्तीसाठीं सर्वस्वाच दान करायला सिद्ध झालेली रमणी प्रेमभंग झाला तर प्रियकराचीच कशी वैरीण बनते. देवयानीच्या प्रणयाराधनेचा घडा भरत आला होता, ऐन वेळी कचानच त्याला तडा पाडला. देवयानीन क्रुद्ध होऊन कचाला शाप दिला, " माझा आशाभंग करून तू चालला आहेस. मी तुला शाप देते की, तू जी विद्या हरण करून जात आहेस ती तुला फलप्रद ठरणार नाही ! "

कचान या शापाला शापानच प्रत्युत्तर केल,

पढवीन ज्यासि विद्या ही त्यासि फळेल तूहि घे शाप।
परि कोणीही ऋषिसुत न वरील तुझे तुला फळो पाप ॥

कचानं विचार केला, " माझी संजीवनी विद्या मला फलप्रद ठरणार नाही, तर नाही. मी ती ज्यांना ज्यांना शिकवीन त्यांना तर उपयुक्त ठरेल ना! "

केवढी ही कल्पकता, कोणत्या प्रतीची कर्तव्यनिष्ठा! किती कष्ट उपसून, अक्षरशः तीनदां मरण सोसून, देवयानीसारख्या सुस्वरूप कामिनीच्या मोहापासून अलिप्त राहून कचानं देवांची कामगिरी पार पाडली!

आज भारताला अनेक शस्त्रांचं, शास्त्रास्त्रांचं, अणुसंशोधनाचं, अंतराळ-प्रवासतंत्रांचं ज्ञान हवं आहे. साहजिकच आपलं सरकार हजारो विद्यार्थ्यांना दरसाल परदेशात पाठवितं. बरोबरच आहे ते.

यस्तु संचरते देशान्यस्तु सेवेत पण्डितान्।
तस्य विस्तारिता बुद्धिस्तैलबिन्दुरिवाम्भसि ॥

समर्थही म्हणतात,

दूरेचे दुरी जाती । नाना विद्या शिकती
विद्येने वाढवाती । भाग्यवंत मानिती
गावीच वाढवाती । ते करंटे होती
कोणी विद्या शिकताती । तरी विदेशा जाती

हिंडता शाहणे होते । घरीच बैसते खोटे.
नित्य नूतन हिंडावे । उदंड देशाटन करावे
पृथ्वीमध्ये देश नाना । फिरतां उपवासी मरेना
कोणे एके ठायी जना । जड नव्हे ॥

आपणां सर्वांना आणखी एक उक्ति माहीत आहेच,

केल्याने देशाटन पंडितमैत्री सभेत संचार!

पण कलिकाळाचा महिमा कसा असतो पाहा हो!

आमचे हे विद्यार्थी पुष्कळदा आपल कर्तव्य हा हा म्हणता विसरतात. परदेशात वाहाणाऱ्या दारूच्या नद्यात ते पोहायला पडतात नि भारतातल्या मित्राना पाठवायच्या पत्रात लिहितात, "इकडे दारूबंदी वगैरे अजीबात नाही! दोस्त, जन्माला याव नि परदेशात जाऊन सुरापान कराव. अरे, व्हिस्की, ब्रँडी, व्हेरमूट, व्हाइनवाईन, मोझलवाईन, शांपेन, व्होटका इत्यादी मद्यात साक्षात् स्वर्गसुख आहे! तू कधी येणार? हो, अन् सांगायचच विसरलच. ही पेय तशी स्वस्तही आहेत इकडे. अन् इकडच्या छबेल्या ..."

मद्यपा किं न जल्पन्ति, किं न भक्षन्ति वायसाः ।
कवयः किं न पश्यन्ति, किं न कुर्वन्ति योषितः ॥
मद्यपस्य कुतः सत्यं, दया मांसाशिनः कुतः ।
कामिनश्च कुतो विद्या, निर्धनस्य कुतः सुखम् ॥

मद्यपि लोक काय बडबडणार नाहीत? कावळे काय खाणार नाहीत? कवींना काय दिसणार नाही नि वेश्या काय करणार नाहीत? दारू पिणाऱ्याला सत्याची चाड कसली? मांसाहारी माणसाला दया कुठली? स्त्रीलपटाला विद्या कशी साधणार? निर्धनाला सुख कसल मिळणार?

[आमचे भारतीय विद्यार्थी परदेशी गेले म्हणजे त्यापैकी बहुतेकाची अवस्था अशीच होते विद्या राहते बाजूलाच नि एखाद्या गोऱ्या देवयानीच्या पाठलागातच ते कित्येकदा गर्क होतात. कचान देवयानीजवळ प्रेमाच सोंग केल, तिला भुळविल, तिच्या बापाला खुलविल नि शेवटी हवी ती विद्या हस्तगत केली पुष्कळ भारतीय तरुण परदेशी पऱ्याच्या प्रीतिकटाक्षात घायाळ होऊन त्याचच लोढण गळ्यात बांधून घेतात, बापान कर्ज काढून दिलेल धन मदिरेच्या मदात मदिराक्षीवर उधळतात! पतीच पैशाच पाकीट खचल म्हणजे ती अगना टोक्यावून अग्नि टाकत घटस्फोटाच्या कोर्टात त्याला खेचते देहाच्या चिंधड्या घेऊन अनूचे धिडवडे फडकावत शेवटी हे राजश्री मधभूला परतात ते धनाशिवाय नि ज्ञानाशिवाय प्रेमाची परदेशी धडकी तर अशी मर्मी बसलेली असते की पुन्हा ती आठवणही त्याला नको असते! दुधान तोंड भाजल म्हणजे माणूस ताकही फुकून पितो म्हणतात ना! पुन्हा लग्न हा शब्द कानावर पडला म्हणजे त्याची दातखिळीच बसते] साता समुद्रा-

पलीकडे एकदा झालेल्या 'मंगलानं' स्वारी चांगलीच 'सावधान' होते! त्याच्यापेक्षाही अधिक सावधान झालेले वधूपिते त्याच्या वाटेलाच फिरकत नाहीत! परक्याच्या ज्ञानाकडे लक्ष ठेवण्याऐवजी कन्यांकडे दृष्टि लावली म्हणजे जन्माचं वाटोळं होतं तें असं!

"देवयानीचं चित्त हरण कर पण तिचं पाणिग्रहण न करता तिच्या पित्याजवळची विद्या तेवढी उचलून आण!" असा आदेश देवांनी कचाला दिला होता. त्यानं तो तंतोतंत पाळला. आजच्या भारतीय कचांनी विद्येबरोबर अशी एखादी देवयानी आणली तरी तसं काही फारसं बिघडणार नाही. पण पुष्कळ कच विद्याही आणत नाहीत, देवयानीही आणत नाहीत नि स्वतःही परत येत नाहीत! विद्या चोरायला धाडलेले आजचे कितीतरी आधुनिक हेर स्वतःच आपखुषीनं चोरले जातात!

ही परिस्थिती केव्हा बदलणार? सच्चे कच भारतात पुन्हा कधी निपजणार?

—अर्घ्य : ४—



## — ज्ञानदीप

जयाचेनि उजाळे । उघडती बुद्धीचे डोळे
जीव दोंदावरी लोळे । आनंदाचिये ॥

ऐसे जें ज्ञान । पवित्रैकनिधान ।
जेथें विटाळलें मन । चोख कीजे ॥

तें ज्ञान हृदयीं प्रतिष्ठे । आणि शांतीचा अंकुर फुटे ।
मग विस्तार बहु प्रगटे । आत्मबोधाचा ॥

— श्री ज्ञानेश्वर

तुमच्या आमच्या जीवनाचा आरसा :

# श्रीरामचरित्र

पवित्रं चरित्रं विचित्रं त्वदीयं ।
नरा ये स्मरन्त्यन्वहं रामचन्द्र ॥
भवन्तं भजन्तो भवान्तं भरन्तं ।
लभन्ते कृतान्तं न पश्यन्त्यतोऽन्ते ॥

— आद्य शंकराचार्य

हे रामचंद्रा, तुमचं चरित्र पवित्र आणि आश्चर्यकारक आहे. दररोज त्याचं पठण करून तुम्हाला जे भजतात त्यांना तुमची प्राप्ति होते. त्यांचं संसार-दुःखं तुम्ही नष्ट करता, अंतकाळी यमदर्शन घेण्याची पाळी त्यांच्यावर येत नाही.

रामनामाचा निदिध्यास घेतलेल्या माहनिरायांनी केवळ रामनामाचा उद्घोष सतत कानी पडावा म्हणून अमरत्व पत्करलं. सहस्त्रावधि साधुसंतांनी रामनामाचं स्तवन करण्यातच जीविनाचं सार्थक मानलं. जावेचा नारायण तर रामभक्तीपायी रामदास बनला. अंतसमयी म गांधींच्या मुखी शब्द होते, "हे राम!"

ज्याच्या नामाचा एवढा थोर महिमा ते राम स्वतः कसे होते, कोण होते ? राम स्वतः म्हणतात,

"आत्मानं मानुषं मन्ये। रामं दशरथात्मजम् ॥

*मी स्वतःला मानव समजतो. मी दशरथाचा पुत्र असून माझं नांव राम आहे.*

राम हे देवाचे अवतार मानले तरी ते या पृथ्वीतलावर, भरतभूमीत, अगदी आमच्या महाराष्ट्रांतही मानवदेहात वावरत होते. रामांचे वरील उद्गार

या बाबतींत ग्राह्य मानायला कांहीच हरकत असू नये. रामांच्या चरित्राची माहिती वाल्मीकींना कळली ती प्रथम नारदांकडूनच. पत्रकारच ना! जगाला जाग देणारे पहिले कीर्तनकार! नारदमुनि किती चतुर आहेत पाहा हं! अध्यात्मरामायणाच्या आधारानंच ही माहिती मी देत आहे.

रामांच्या राज्याभिषेकाची तयारी चाललेली होती. जिकडेतिकडे आनंदीआनंद दाटला होता. एकदा राम नटूनथटून आपल्या अंतःपुरांतील रत्नसिंहासनावर बसले होते. रत्नांच्या दांडयाची चवरी घेऊन त्यांची प्रियपत्नी सीता त्यांना वारा घालत होती. पानाचा विडा देतघेत ते पतिपत्नी प्रेमालाप करत होते. इतक्यांत नारदमुनि तिथं अचानक उपस्थित झाले. राम व सीता यांनी गडबडीनं उठून त्यांना साष्टांग प्रणाम केले. रामानी विचारलं "मुनिश्रेष्ट, आमच्यासारख्या विषयासक्त संसारी माणसांना आपलं दर्शन घडल्यानं आम्ही कृतकृत्य झालो आहो. आता आपलं कोणतं कार्य मजकडून होऊ शकेल ते सांगावं!"

रामांची बरीच स्तुति करून नारद मुद्याच्या गोष्टीकडे वळले.

"हे राघवा, ब्रह्मदेव तुझ्या नाभिकमलापासून उत्पन्न झाले. त्या, ब्रह्मदेवाचा मी पुत्र म्हणजे तुझा नातूच आहे!"

हा नातू रामाला अरे जारेनं बोलावितो तर आजोबा राम नातवाला अहो, जाहो म्हणतात! ही गंमत आपली अशा जुन्यापुराण्या कथांतून शोभून दिसते खरी!

आता पुढं हे प्रपौत्र नारद काय सांगतात ऐका, "रामा, मला ब्रह्मदेवानं पाठवलं आहे. तुझा अवतार रावणाच्या वधाकरता आहे हे तू विसरू नकोस! आता तुझ्या राज्याभिषेकाची जंगी तयारी चाललेली आहे. तू जर राज्याची चैन भोगण्यात गुंगून गेलास तर मग तुझ्या हातून रावणाचा निकाल कसचा लागणार? पृथ्वीला भार होऊन राहिलेल्या त्या दुष्टाचा नाश करण्याची तू प्रतिज्ञा केलेली आहेस! होय ना?"

राम हा मानव होता की देव होता की देवाचा मानवी अवतार होता हा प्रश्न, मला वाटतं, रामकथेच्या बाबतीत अधूनमधून खुंटीला टांगून ठेवणं बरं असतं. या प्रश्नांची थोडीफार गल्लत झाली तरी ती ठीकच वाटते, नाही का?

आपण आता नारदांचा प्रश्न ग्राह्य मानून असं समजायला हरकत नाही की, साऱ्या देवांनी रामांना पृथ्वीच्या राज्यपदी निवडलं होतं ते रावणाच्या संहाराकरता !

राम बहुधा प्रचंड बहुमतानं किंवा एकमतानं निवडून आले असावे. आता त्यांचा मोठ्या वडेजावानं राज्याभिषेक होणार! सुंदर सीता ही राणी तर त्यांना लाभलीच आहे. आता ही स्वारी सुखभोगात मशगुल होऊन कर्तव्याला जागली नाही तर? निवडणुकीच्या पूर्वी दिलेली वचनं विसरली तर?

देवरूपी मतदारांना देखील रामासारख्या कर्तव्यनिष्ठ उमेदवाराबद्दल असा संशय होता. उमेदवार निवडून आल्यानंतर त्याला त्याच्या कर्तव्याची आठवण देण्याकरता ते नारदासारख्या पत्रकाराची योजना मोठ्या कौशल्यानं करत असत. नारद पट्टीचे, मृदुभाषी, निर्भीड पत्रकार होते. त्यांनी रामाला रोखठोक बजावलं, "हे राजेंद्रा, तुझी प्रतिज्ञा खरी करून दाखव. तू सत्य-प्रतिज्ञ आहेस!"

अर्थातच रामानं नारदाला प्रतिज्ञापूर्तीचं वचन दिलं व नंतर ते तंतो-तंत पाळलं हे सर्वश्रुत आहेच. निवडणुकांच्या वेळी गोडगोड भाषेत पत्रकं, वक्तव्यं, जाहिरनामे काढून मतदारांना उदार वचनं देणाऱ्या व अधिकार-पदावर आल्यानंतर त्यांना साफ काळोखी फासणाऱ्या आजच्या सत्तालोभी मंडळींनी रामाचं हे उदाहरण लक्षात ठेवण्यासारखं आहे. मतदारांनीही निर्भीड पत्रकारांना पाठिंबा देणं अवश्य नाही का?

नारदानी रामांना कर्तव्याची प्रेरणा दिली. कर्मयोगाची उपासना त्यांना शिकविली. राम स्वतः एक निष्ठावान क्षत्रिय होते, कर्मयोगी होते दयामाया न ठेवता त्यांनी शत्रूचा निःपात केला. स्वतःच्या जीवनसूत्राचा अर्थ पत्नी जानकीला सांगताना ते म्हणतात,

किन्तु वक्ष्याम्यहं देवि त्वयैवोक्तमिदं वचः।
क्षत्रियैर्धार्यते चापो नार्तशब्दो भवेदिति ॥

अप्यहं जीवितं जह्यां त्वां वा सीते सलक्ष्मणाम्।
न तु प्रतिज्ञां संश्रुत्य ब्राह्मणेभ्यो विशेषतः ॥

—वाल्मीकिरामायण

आर्त किंवा पीडित हा शब्दच जगात राहू नये म्हणून क्षत्रियानं धनुष्य घ्यावयाचं असतं. सीते, एखाद्या वेळी मी तुझा किंवा लक्ष्मणाचाही वियोग सहन करीन. पण क्षात्रधर्मपालनाच्या प्रतिज्ञेचा भंग मी होऊन देणार नाही!

प्रेम की कर्तव्य असा प्रश्न निर्माण झाला तर राम कर्तव्यनिष्ठच राहणार! प्रेमासारख्या वैयक्तिक भावनांना त्यांच्याजवळ दुय्यम स्थान होतं.

आपल्या कार्याचं महत्व वालीला समजावून सांगताना राम म्हणतात, "धर्माचा संरक्षक म्हणून मी या जगात धनुष्य घेऊन फिरत असतो. अधर्मानं वागणाऱ्यांची हत्या करून मी सद्धर्माचं रक्षण करतो."

(अध्यात्मरामायण)

पण कितीही कर्तव्यकठोर असले तरी राम गुणाचे चाहाते होते. रावण अन्यायी, अधर्मानं वागणारा होता; शिवाय तो शत्रू होता. त्याचा वध केल्यानंतर रामाने त्याच्या शौर्याची प्रशंसा मनमोकळेपणानं केली आहे. रावणाच्या प्रेताची उत्तरक्रिया करायला त्याचा भाऊ बिभीषण काकू करू लागला तेव्हा राम त्याला म्हणाले, "मरणान्तानि वैराणि! शत्रू मरेपर्यंतच त्याच्याशी वैर करायचं असतं. या महान् रावणाचा पराभव इंद्रादि देवांनाही करता आला नाही. याच्या जिवंतपणी अवघ्या पृथ्वीला थरकाप सुटला होता! आता तो माझा शत्रु नाही. तू विधिपूर्वक त्याचे संस्कार अवश्य केले पाहिजेस!"

रामांचं हें उदात्त चारित्र्य डोळे दिपवून टाकत नाही का?

रामचरित्र तुम्हाआम्हाला इतकं प्रिय का वाटतं? रामायणातल्या कथा आपल्या अंतःकरणाला भिडतात, मनात घर करून राहतात. ही एक साधी गोष्टच पाहा. सीतेनं कांचनमृगाचा हट्ट घेतला नि तो पुरविण्याच्या खटपटीला तिचा पति राम लागला. इकडे रावणानं भिक्षुवेशानं येऊन सीतेचं हरण केलं. संकटं कोसळली.

आजही असा गोष्टी दररोज घडत नसतात का? कोणीतरी सीताबाई रामरावांजवळ कांचनमृगाचा नसला तर निदान कांचनाचा किंवा नव्या साडीचा हट्ट धरून बसते. बिचारा रामराव बायकोचं कोडकौतुक पुरवावं म्हणून जिवाचा आटापिटा करतो नि त्यांतून अकल्पित संकटपरंपरा निर्माण होतात!

पुनःप्रत्ययाचा आनंद देणारं ते उत्कृष्ट वाङ्मय असं काही विद्वान् मंडळींचं मत आहे. रामायण वाचताना प्रत्येक वाचकाला निश्चितपणानं असं वाटतं की, वस्स हे प्रसंग थेट माझ्या जीवनातलेच आहेत जणू! रामाला राज्य सोडून वनवासाला जा म्हणणारा दशरथ नि सापत्नपणाचा अतिरेक करणारी कैकेयी. "घराबाहेर आताच्या आता चालता हो!" असं मुलांना सांगणारे बाप आज आपण पाहतोच ना!

सीतेला सुवर्णमृग हवा म्हणून त्याच्या शोधाला जाणाऱ्या रामांनी लक्ष्मणाला सांगितलं, "रक्षत्वमतियत्नेन सीतां मत्प्राणवल्लभाम्! माझी प्राणवल्लभा जी सीता तिचं प्रयत्नपूर्वक सरक्षण कर!

पुढं रामांच्या सुरक्षिततेविषयी संशय निर्माण होऊन सीता लक्ष्मणाला म्हणते, "तू रामाच्या साहाय्याला तावडतोब जा!" लक्ष्मणावर सीतेच्या संरक्षणाची जबाबदारी असते. तो तिला सोडून जाण्याचं नाकारतो तेव्हा ती त्याच्यावर दुष्ट हेतूंचे आरोप करते,

अनार्य करुणारम्भ नृशंस कुलपांसन।
अहं तव प्रियं मन्ये रामस्य व्यसनं महत्।
रामस्य व्यसनं दृष्ट्वा तेनैतानि प्रभाषसे॥
नैव चित्रं सपत्नेषु पापं लक्ष्मण यद्भवेत्।
त्वद्विधेषु नृशंसेषु नित्यं प्रच्छन्नचारिषु॥

हे अनार्या, कुलकलंका, दुष्ट नराधमा, रामावरील संकट तुला प्रिय आहे असं मला वाटतं. तुझ्यासारख्या सावत्र भावाकडून दुसरी कसली अपेक्षा!

पुढे ती म्हणते, "माझ्या प्राप्तीसाठी तू टपून बसला आहेस! पण इन्दीवरश्याम, कमलनेत्र रामचंद्राच्या सहवासानंतर तुझ्यासारख्या अधमाला कोणती पतिव्रता वरण करील?"

ज्या लक्ष्मणानं सीतेच्या चेहऱ्याकडेही कधी वर तोंड करून पाहिलं नव्हतं त्याच्यावर हे आरोप!

सीतेचे दागिने ओळखण्याच्या प्रसंगी विरहदुःखानं पोळलेल्या रामाच्या डोळ्यांत अश्रूंनी गर्दी केली. त्यांनी दागिने ओळखायचं काम लक्ष्मणावर सोपविलं तर तो म्हणतो,

नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुण्डले ।
नूपुरेत्वभिजानामि नित्यं पादाभिवन्दनात्॥

दररोज सीतेच्या पाया पडणाऱ्या लक्ष्मणाला सीतेच्या नूपुरांचीच तेवढी ओळख पटली. केयूरकुंडलं पाहायला त्यानं वर मान करून सीतेला कधी पाहिलं असेल तर ना !

ज्या सीतेबद्दल इतकी अत्यादराची, भक्तीची भावना लक्ष्मणानं ठेवली होती त्याच्यावर खुद्द सीतेनंच दुष्टपणाचे आरोप केले होते। गैरसमजावर आधारलेल्या अशा कादंबऱ्या तुमच्याआमच्या जीवनातही अधूनमधून घडत नाहीत का ?

शूर्पणखेची गोष्ट माहीत आहे ना ? तिनं रामांना मागणी घातली होती· लग्नाच्या मोसमांत स्वतःच्या कुरूप मुलीचं काव्यपूर्ण वर्णन ऐकविणारे वधूपिते तुम्ही पाहिलेच असतील. किंवा एखादी आधुनिक तरुणी स्वतःच जाहिरात देऊन सांगते, " वधू गोरीपान, सुंदर, नीटस, बी. ए. पर्यंत शिकलेली. इ. इ. " प्रत्यक्ष भेट घेऊन तिला मागणी करायला गेलेला तरुण मात्र बेशुद्ध पडायच्या घाईला येतो. नंतर आपल्या मित्रमंडळीत तो स्वतःच्या या फजीतीचं वर्णन दिलखुलासपणानं करतो. हसता हसता सर्वांची मुरकुंडी वळते. आजकाल वधूला वर कसला हवा असतो माहीत आहे?

★

— पति असावा असा !

पती असावा कसा ?
सहो ग बाई, पती असावा असा !
सदावत उंच नि सुंदर गोरा
हजार त्याला पगार प्यारा
माझ्या हाती देई सारा !
सदा रिकामा खिसा —
ग त्याचा सदा रिकामा खिसा ।

पुनःप्रलयाचा आनंद देणारं ते उत्कृष्ट वाङ्मय असं काही विद्वान् मंडळींचं मन आहे. रामायण वाचताना प्रत्येक वाचकाला निश्चितपणानं असं वाटतं की, वस्स हे प्रसंग थेट माझ्या जीवनातलेच आहेत जणू! रामाला राज्य सोडून वनवासाला जा म्हणणारा दशरथ नि सापत्नपणाचा अतिरेक करणारी कैकेयी. "घराबाहेर आनाच्या आना चालता हो!" असं मुलांना सांगणारे बाप आज आपण पाहतोच ना!

सीतेला सुवर्णमृग हवा म्हणून त्याच्या शोधाला जाणाऱ्या रामांनी लक्ष्मणाला सांगितलं, "रक्षस्त्वमतियत्नेन सीतां मत्प्राणवल्लभाम्! माझी प्राणवल्लभा जी सीता तिचं प्रयत्नपूर्वक संरक्षण कर!

पुढं रामांच्या सुरक्षिततेविषयी संशय निर्माण होऊन सीता लक्ष्मणाला म्हणते, "तू रामाच्या साहाय्याला तावडतोब जा!" लक्ष्मणावर सीतेच्या संरक्षणाची जबाबदारी असते. तो तिला सोडून जाण्याचं नाकारतो तेव्हा ती त्याच्यावर दुष्ट हेतूंचे आरोप करते,

अनार्य करुणारम्भ नृशंस कुलपांसन।
अहं तव प्रियं मन्ये रामस्य व्यसनं महत्।
रामस्य व्यसनं दृष्ट्वा तेनैतानि प्रभाषसे॥
नैव चित्रं सपत्नेषु पापं लक्ष्मण यद्भवेत्।
त्वद्विधेषु नृशंसेषु नित्यं प्रच्छन्नचारिषु॥

हे अनार्या, कुलकलंका, दुष्ट नराधमा, रामावरील संकट तुला प्रिय आहे असं मला वाटतं. तुझ्यासारख्या सावत्र भावाकडून दुसरी कसली अपेक्षा!

पुढे ती म्हणते, "माझ्या प्राप्तीसाठी तू टपून बसला आहेस! पण इन्दीवरश्याम, कमलनेत्र रामचंद्राच्या सहवासानंतर तुझ्यासारख्या अधमाला कोणती पतिव्रता जवळ करील?"

ज्या लक्ष्मणानं सीतेच्या चेहऱ्याकडेही कधी वर तोंड करून पाहिलं नव्हतं त्याच्यावर हे आरोप!

सीतेचे दागिने ओळखण्याच्या प्रसंगी विरहदुःखानं पोळलेल्या रामांच्या डोळ्यांत अश्रूंनी गर्दी केली. त्यांनी दागिने ओळखायचं काम लक्ष्मणावर सोपविलं तर तो म्हणतो,

नाहं जानामि केयूरे नाहं जानामि कुण्डले ।
नूपुरेत्वभिजानामि नित्यं पादाभिवन्दनात्॥

दररोज सीतेच्या पाया पडणाऱ्या लक्ष्मणाला सीतेच्या नूपुरांचीच तेवढी ओळख पटली. केयूरकुंडलं पाहायला त्यानं वर मान करून सीतेला कधी पाहिलं असेल तर ना!

ज्या सीतेबद्दल इतकी अत्यादराची, भक्तीची भावना लक्ष्मणानं ठेवली होती त्याच्यावर खुद्द सीतेनंच दुष्टपणाचे आरोप केले होते! गैरसमजावर आधारलेल्या अशा कादंबऱ्या तुमच्याआमच्या जीवनातही अधूनमधून घडत नाहीत का?

शूर्पणखेची गोष्ट माहीत आहे ना? तिनं रामांना मागणी घातली होती।

लग्नाच्या मोसमांत स्वतःच्या कुरूप मुलीचं काव्यपूर्ण वर्णन ऐकविणारे वधूपित्ते तुम्ही पाहिलेच असतील. किंवा एखादी आधुनिक तरुणी स्वतःच जाहिरात देऊन सांगते, " वधू गोरीपान, सुंदर, नीटस, बी. ए. पर्यंत शिकलेली. इ. इ. " प्रत्यक्ष भेट घेऊन तिला मागणी करायला गेलेला तरुण मात्र बेशुद्ध पडायच्या घाईला येतो. नंतर आपल्या मित्रमंडळीत तो स्वतःच्या या फजीतीचं वर्णन दिलखुलासपणानं करतो. हसता हसता सर्वांची मुरकुंडी वळते. आजकाल वधूला वर कसला हवा असतो माहीत आहे!

★

## — पति असावा असा!

पती असावा कसा ?
सखे ग बाई, पती असावा असा !

सशक्त उंच नि सुंदर गोरा
हजार त्याला पगार प्यारा
माझ्या हाती देई सारा !

सदा रिकामा खिसा –
ग त्याचा सदा रिकामा खिसा !

पाणी मागता सरबत देतो
चहाबरोबर पोहे आणतो
सिनेमास मज घेऊन जातो

" हॉटेलांत जेऊं, बसा ! "
ग म्हणतो, " हॉटेलांत जेऊं, बसा ! "

घरचे सारे काम आवरतो,
अन्न शिजवुनी जेवु घालतो (नव्हे, घास घालतो)
नियमित इफिसा जातो येतो,

आज्ञाधारक असा !
ग बाई, आज्ञाधारक असा !

मूर्तिमंत कुरूपता अशी शूर्पणखा रामाला मागणी घालते तो प्रसंग विनोदपूर्ण नाही का ! ही महाविद्रूप नि भयंकर रौद्रस्वरूपी राक्षसीण मदनासारख्या रामाची प्रेमाराधना करताना म्हणते, "तूं माझा पति हो. या विरूप नि भयानक सीतेबरोबर आपलं आयुष्य का उगाच दवडतोस? तुला मीच कशी शोभून दिसते. या मानुषी सीतेला नि तुझ्या भावाला मी भक्षून टाकते. नंतर आपण खूप मौज करू!"

आता हसावं की की रडावं सांगा. रामांच्या विनोदबुद्धीला बहर येतो. राम म्हणतात, "अग शूर्पणखाबाई, माझं एक लग्न झालेलं आहे. तुझ्यासारख्या स्त्रीला सवतीच्या हाताखाली नांदणं केवढं असह्य होईल बरं! त माझ्या या स्वरूपसुंदर भावाबरोबर, लक्ष्मणाबरोबर लग्न कर. तुमचा जोडा किती सुंदर दिसेल!"

कांचनमृग पकडायला गेलेले राम परत येतात नि त्यांना कळून चुकतं की रावणानं सीतेचं हरण केलं आहे. पश्चात्ताप, विरह नि शोक यामुळे विव्हल होऊन हा शूर वीर अरण्यांतल्या पशुपक्ष्यांना, वनदेवतांना, लतापल्लवांना विचारू लागतो, "माझी सीता कुठं आहे! कुणी तरी सांगा ना!"



## — सीतासुंदरी माझी राणी !

कोठे गेली हृदयस्वामिनी,
सीतासुंदरि माझी राणी ?

बोला ग वेलींनो,
सांगा रे वृक्षांनो,
वार्ता द्या पक्ष्यांनो,
वदा कुठे ती मधुरभाषिणी !

सांगसांग तूं हरिणा,
कोठे सखि मृगनयना ?
ठावे का तुज गगना ?
रुसली का ती प्रिया, कामिनी ?

सिंहा, ती सिंहकटी,
आली का दृष्टिपथी —
सुभगा, लावण्यवती !
गजा पाहिली का गजगामिनी ?

ज्योत जळे स्नेहहीन ?
जीव काय प्राणशून्य ?
राम कसा सीतेवीण ?
राजा असुनी, रंक जीवनी !

केवढा कारुण्यपूर्ण प्रसंग!

आमच्या कलियुगात असल्या घटनांना तोटा आहे का? रामचरित्र हे जणू तुमचंआमचं जीवनचरित्र आहे नि म्हणूनच ते आपणाला चटका लावतं.

मानवी जीवनाच्या सर्व अंगोपांगांचा अतिसुंदर आविष्कार रामचरित्रांत झाला आहे अन् म्हणूनच जागतिक वाङ्मयांत त्याला श्रेष्ठतेचा दर्जा लाभला आहे. रामायण म्हणजे पुनःप्रत्ययाचा आनंद, रामायण म्हणजे तुमच्याआमच्या जीवनातल्या हर्षविषादाच्या गुजगोष्टी!

रामचरित्राच्या दुसऱ्या एक महत्त्वाच्या बाजूकडे आपण अधिक चौकस-पणान पाहायला हव. राम हे एक अतिशय थोर मुत्सद्दी व राजकारणी पुरुष होऊन गेले, पराक्रमी योद्धे तर ते होतेच होते

सीमेवरच्या राज्यातल्या श्रेष्ठ सत्तेन भरतभूमीचा एक लचका तोडला, राजाच्या राणीलाच पळवून नेल! राम या अपमानान सतत जळत राहिले. रावणाचा विध्वंस करून त्याच्यावर सूड घेतलाच पाहिजे हा दृढनिश्चय तर त्यानी केव्हाच करून टाकला "रावण तसा काही वाईट नाही त्यान सीतेच हरण केल नसून अशोकवनात तो तिचा पाहुणचार करत आहे!" असा रावणाचाच स्तुतिपाठ गाणारे लोक कदाचित आजच्या भारतीय राजकारणात आढळतील. रामराज्यात शत्रूला शत्रूच गणल जात होत!

रामानी आपल्या वनवासातही कर्मयोग व सहकार या दोन तत्त्वाचा अंगिकार केला सतत श्रम करून त्यानी सुग्रीवासारख्या वानरराजाच प्रेम व सहकार्य संपादन केल. हनुमान तर रामाचे थोर सेवक बनले अगदही त्याचाच दास खुद्द रावणाच्या भावाला, बिभीषणाला त्यानी आपल्या पक्षात घेतल! शत्रूच्या अतरंगाचा तलास कसा करायचा असतो ते आम्ही रामा पासून शिकाव!

रावण केवढा बलिष्ट शत्रु राम मात्र राज्याच, सैन्याच, पैशाच पाठबळ नसलेले एक वनवासी–निर्वासित–होते. पण त्या परिस्थितीतही त्यानी प्रयत्न टाकला नाही. महत्त्वाकांक्षा सोडली नाही, शत्रूचा नायनाट करण्याची ईर्षा तर त्याच्या मनात क्षणोक्षणी उफाळून येत होती. अयोध्यानगरीतले मत्री, सेनापति, सैनिक, हत्तीघोडे, रथ, सरथी राहू देत तिकडे, रामानी नवे मत्री जोडले, अस्वलाकडून, वानराकडून, पक्ष्याकडूनही त्याना नवे सल्लागार व मुत्सद्दी निर्माण केले कोटिकोटि वानरकुल त्यानी महावीर्यशाली सैनिक तयार केले राज्यकर्त्यांच्या अगी योजनाचातुर्य असल म्हणजे वानरांकडूनही बलशाली नर निर्माण करता येतात, ते नसल तर माणसाच्या सैन्याकडूनही मर्कटचेष्टाच घडून यायच्या!

रामानी हनुमानाच्या नेतृत्वाखाली एक महाबलाढ्य वानरसेना सीतेच्या शोधाकरता पाठविली मारुतीला राजकारणाचे काही महत्त्वाचे धडेही रामानी पढविले "अन् माझ नांव कोरलेली ही अगठीही बरोबर ने म्हणजे तू माझाच दूत आहेस हें सीतेला कळेल!" ती अगठी घेऊन मारुती सीताशोधार्थ निघाला.

मारुतीनं उड्डाण करून समुद्र ओलांडला. वायुवेगानं तो त्या सुवर्णमयी लंकेत येऊन पोहोचला. पहारा करणाऱ्या एका राक्षसीनं त्याला पाहिलं नि दटावलं, " ए माकडा, कोणाच्या परवानगीनं लंकेत शिरलास ? "

मारुतीनं तिला एक दणदणीत गुद्दा देऊन जमिनीवर लोळविलं! पाहिलंत हा रामाचा दूत कसा होता तें? रामांनी त्याला शत्रूच्या राजधानींत पाठवून पहिला हिसका हा असा दाखविला. शत्रूशी बोलणी ही अशी करावयाची असतात! सीतेच्या शोधार्थ पुढं तो वाड्यावाड्यांच्या महालांतून भटकला. त्यानं कितीतरी सुंदर स्त्रिया पाहिल्या, कुरूपतेचे नमुनेही पुष्कळ पाहिले. सुवर्णमंदिरं, वैभवशाली प्रासाद, हिरेमाणकं, रत्नालंकार पाहून तो दिपून गेला नाही. सुंदर स्त्रियांचा मोह त्याला पडला नाही, मदिरेचे कलश दिसताच त्याच्या जिभेला पाणी सुटलं नाही! अलीकडे भारतातून परदेशी जाणाऱ्या शिष्टमंडळांतील यांही शिष्टप्रमाणं स्वकर्तव्य विसरून तो मदिरा नि मदिराक्षींच्या आहारी गेला नाही!

हा वानर खुद्द रावणाच्या अंतःपुरांतच शिरला. हिऱ्यामोत्यांनी मढविलेल्या पलंगावर रावण घोरत पडला होता. एका बाजूस रत्नजडित पलंगावर एक अत्यंत रूपवती स्त्री निजलेली होती. तिच्या अंगावर सुंदर अलंकार होते, सुखनिद्रेत रमलेलं तिचं मुख आनंदित दिसत होतं. मारुतीला वाटलं, हीच ती सीता! त्यानं हर्षानं टुणकन् एक उडी मारून आपली शेपटी फुरवाळली!

पण एवढ्यान त्या वानराच्या तर्कबुद्धीला सुचलं, " रामवियोगानं पोळलेली सीता अलंकार कसे घालील? तिला इतकी शांत झोप येईलच कशी? ही सीता असणं शक्य नाही!"

त्या शय्यागृहातल्या मद्याची चव जर अगोदरच मारुतिरायानं घेतली असती तर त्याची ही तर्कबुद्धि जागी राहिली असती का? आमच्या शिष्टमंडळांनी हे उदाहरण गिरवायला काय हरकत आहे?

त्यानं अनेक उद्यानं पालथी घातली. शेवटी अशोकवनांत त्याला एक स्त्री दिसली; कृश, अश्रु ढाळणारी, मलिन वस्त्र नेसलेली, अलंकाररहित! तिची काळीभोर वेणी पाठीवर रुळत होती, तिचा चेहरा म्लान झालेला होता, एका शिलाखंडावर उदासपणानं बसली होती ती! तिच्याभोवती होता राक्षसिणींचा गराडा!

हीच ती सीता असली पाहिजे हें त्यानं ओळखलं. इतक्यात रावण तिथं आला नि सीतेला म्हणाला, "हे सुंदरी, आता मला वश हो, माझ्या-सारख्या बलाढ्य राजाला आता तो तपस्वी राम कसा जिंकणार ?"

त्या पतिव्रतेनं कठोर शब्दांत रावणाची निर्भर्त्सना केली. रावण तिच्यावर ओरडून म्हणाला, "आणखी दोन महिन्यांत जर तू माझ्या शय्यागृहांत आली नाहीस तर माझा आचारी तुझं मांस शिजवून मला जेऊ घालील!"

मारुतीला सीतेचा अभिमान वाटला. रावण परत गेल्यानंतर त्यानं सीतेला आपली ओळख पटविली. राम आपल्या विमोचनाची प्रचंड योजना आखत आहे हे ऐकून त्या साध्वीला पराकोटीचा आनंद झाला!

हनुमानानं परत जाण्यापूर्वी त्या बागेत धुमाकूळ घातला. अनेक इमा-रतींचा त्यानं विध्वंस केला. कितीतरी राक्षसांना त्यानं लोळविलं, कित्येकांना ठार केलं. खुद्द रावणाच्या दरबारांत त्यानं कल्लोळ माजविला. रावणाच्या आज्ञेवरून त्याच्या शेपटाला चिंध्या बांधण्यात आल्या व त्यांना आग लावण्यात आली. वा उत्तम! मारुतीनं सारी लंकाच पेटवून दिली.

बळे लागला चंडवारा मरारा । पुरीमाजि तो वन्हि धावे सरारा ।
शिखा चालल्या अंतराळी भडाडा । जळो लागली दिव्य लंका धडाडा ।
रिपू सोडिले पाडिले हुद्यवाते । भुमी लोळती दैत्य होवोनि प्रेतें ।
पुढे देखता जळमाळी कुर्दीला । बळे आखया आखरीला पिटीला ।
पळाले कपी फूटली राक्षसांची । पुढे हाक गेली तया आखयाची ।
असंमाव्य ते तूटले पादपाणी । घडे मस्तके घोर विक्राळवाणी ।
नदी शोणिताचे महापूर जाती । घडे कोथळे फूटले ते वहाती ।

—समर्थ रामदास

शत्रूशी बोलणी अशी करावयाची असतात! त्याच्याच राजधानीत, अगदी त्याच्या अंतःपुरात! आपल्या देशात त्याला बोलावून नव्हे, आपल्या भूमीचे त्यानं लचके तोडल्यावर कागदाचे खलिते पाठवून तर नव्हेच नव्हे! रामांनी एकाच सभासदाचं शिष्टमंडळ अगदी प्रथम रावणाकडे पाठविलं असलं! शत्रूच्या छायापासून आपलं संरक्षण कसं करावं याच्या चिंतेत

  

राम बसले नाहीत ! " आता तुझी कातडी तू कशी शाबूत ठेवणार आहेस ते पाहा ! " असा रोकडा सवाल त्यांनी अवघ्या एका वानराकरवी पाठविला !

युद्धशास्त्रातलं हे तंत्र रामांनी अचूक ओळखलं होतं. शत्रुपक्षाचीच अगोदर गाळण उडवून द्यायची ! शत्रूनं आपणावर हल्ला करायच्या अगोदर आलाच हात दाखवायचा, त्याचीच पाचावर धारण बसवायची !

शिष्टाईची पूर्वतयारी ही अशी धिटाईनं करावी लागते. मारुतीनं लंका-दहन केल्यानंतर अंगदाला शिष्टाईची बोलणी करण्याकरता रामांनी रावणाकडे पाठविलं. चपराकीचा धाक बघितल्यानंतर तरी तो राक्षस किंचित् नरमेल अशी अपेक्षा होती. आजच्या पद्धतीनं नमस्कारचमत्कार ( Compliments ) न करता रामांनी रावणाला बजावलं, " राक्षसाधमा ! सीतेला परत कर, अगोदर शरण ये, बऱ्या बोलानं माझ्यापुढं मान वाकव ! तुझ्याभोवती अति-मूर्ख सल्लागारांचं कोंडाळं पडलं असावं असं दिसतं. तू जर माझ्या अटींनुसार विनशर्त शरण आला नाहीस तर तुझ्यासारख्या पापी राक्षसांचा विध्वंस मला करावा लागेल ! "

पाहिलंत, पौरुष नि पराक्रम कशाला म्हणतात ते ? नम्र भाषेत अर्जविनंत्यांची किंवा निषेधांच्या पत्रांची कागदी भेंडोळी पाठवत बसला नाही राम ! शिष्टाईचा एक प्रयत्न करून पाहिला हेच विशेष. बायको पळवून नेणाऱ्या, राज्याचा घास घेणाऱ्या कट्टर शत्रूला हीच भाषा योग्य. सत्कार करून त्याला काय मानपत्र द्यायचं असतं ?

रावणाला पुढली सुबुद्धि सुचायला ? रामांनी आणि त्यांच्या वानर-सैन्यानं लंकेचा, राक्षसांचा, रावणाचा महाभयंकर पराभव केला. कुंभकर्ण कामी आला, रावणही मेला. रामरावणयुद्धाचं वर्णन रामदासांनी किती वीरश्री-पूर्ण भाषेत केलं आहे पहा :

असंख्य वीर जातसे धुराळ गर्द होतसे ।
थरार मारिती शिरे कितेक हाणती करे ॥

पछोनिया उपाळिती घटें भळी घुमाळिती ।
कळेचि पोर फाडिती निशाचरा विलोडिती ॥

कपी चपेट मारिले कितेक दैत्य आटले ।
हाणिती लपेटिती चिह्न कूटकूटिती ॥

तडाड तुटली शिरे उलटती कलेवरे।
कपी तुम्बल सूटले असंख्य सैन्य आटले॥

कडाडिले खडाडिले गडाडिले घडाडिले।
तडाडिले थडाडिले दडाडिले धडाडिले॥

रावणाच्या सज्जन भावाला, बिभीषणाला रामांनी लंकेचं राज्य दिलं. प्रिय पत्नी सीता रामांना परत मिळाली. जिकडे तिकडे आनंदीआनंद झाला!

भारतांत रामराज्य नांदू लागलं. राजसिंहासनावर आरूढ झालेल्या श्रीरामांचं वर्णन बुधकौशिक ऋषींनी किती समर्पक भाषेत दिलं आहे:

ध्यायेदाजानुबाहुं धृतशरधनुषं बद्धपद्मासनस्थं।
पीतं वासो वसानं नवकमलदलस्पर्धिनेत्रं प्रसन्नम्॥
वामाङ्कारूढसीतामुखकमलमिलल्लोचनं नीरदाभं॥
नानाऽलंकारदीप्तं दधतमुरुजटामण्डनं रामचन्द्रम्॥

रत्नखचित सिंहासन। वरी शोभे रघुनंदन
वामांकी ते सीताबाई। जग-जननी माझी आई
पश्चाद्भागी लक्ष्मण। पुढे अंजनीनंदन
भरत शत्रुघ्न ते भाई। चामरे ढाळिती दोही बाही
नीळ जांबुवंत। अंगद सुग्रीव बिभीषण भक्त
देहबुद्धी नेणो काही। दास अंकित रामापायी

—समर्थ रामदास

"लंकेत सोन्याच्या विटा" ही म्हण रामकालापासून चालत आलेली आहे. लंका खरोखरच वैभवशिखरावर झुलत होती. लक्ष्मणाला देखील लंकेच्या संपदेनं मोहित केलं. तो रामांना म्हणाला,

"दादा, आपण आता इतकी वर्षं वनवासांत आहोत, अयोध्येपासून दूर आहोत. भरत आपणाला विसरून गेला असेल त्याची बुद्धी फिरली नसेल कशावरून! आपण आता इथंच या सोन्याच्या लंकेत सुखानं राहावं असं मला वाटतं!"

नरश्रेष्ठ रामांनी एक क्षणाचाही विचार न करता जे उत्तर दिलं, ते भारतीय वाङ्मयात अमर झालं आहे

अपि स्वर्णमयी लंका त्वया लक्ष्मण रोचते ।
जननी जन्मभूमिश्च स्वर्गादपि गरीयसी ॥

लक्ष्मणा, तुला ही सुवर्णसमृद्ध लंका आवडते खरी, परंतु जननी आणि जन्मभूमी यांची महती स्वर्गाहूनही श्रेष्ठ असते हे विसरू नकोस !

आजच्या तरुण पिढीच्या कधीमधी कानावरून जाणारे हे शब्द श्रीरामप्रभूंचे आहेत. स्वपराक्रमानं जिंकलेल्या लंकेच्या संपत्तीवर त्यांचा संपूर्ण अधिकार होता. पण तरीही त्या पर-देशावर त्यांचा लोभ बसला नाही, भरतभूला ते विसरले नाहीत.

आमचे काहीकाही तरुण आजकाल मातृभूचं किडुकमिडुक खर्चून सातासमुद्रापलीकडच्या देशांना जाऊन तिकडे वाङ्मय, विज्ञान, वैद्यक इ. शास्त्रांचं ज्ञान मिळवितात. उत्तम गोष्ट. पण त्यातल्या पुष्कळांच्या ज्ञानाचा उपयोग जन्मभूमीला होत नाही ! दुर्दैवाची गोष्ट अशी की, ते जाहीरपणानं सांगतात, " भारतात मिळून मिळून काय मिळणार ? फारतर दरमहा पाचशे रुपये. इकडे मला पाचशे डॉलर्स — हो, जवळजवळ अडीच हजार रुपये — मिळतात ! किंवा इंग्लंड, जर्मनीमध्येही असाच भरभक्कम पगार मिळतो ! मग कशाला मरायचं हिंदुस्थानात ! "

अशा मंडळींचा कडकडून धिक्कार करायच्या ऐवजी त्यांचीच बाजू उचलून घेणारे काही विद्वान् लोक भारतातही आहेत. काय म्हणावं त्यांना ?

म. गांधी, पं. जवाहरलाल नेहरू, बॅ. सावरकर, किंवा सुभाषचंद्र बोस यांच्यासारख्या महाबुद्धिवान भारतपुत्रांना परदेशांत कोट्यावधि रुपये मिळविता आले नसते ! स्वामी विवेकानंदांवर तर लंकेहूनही श्रीमंत अशी अमेरिका भाळली होती, अन् जग त्यांना बोलावत होतं. त्यांनी भारतीय तत्त्वज्ञानाचा संदेश जगाला पोचविला, पण भरतभूमीचीच अखंड सेवा केली.

युरोपातल्या दोन देशांत मला स्वतःला फार मोठ्या पगाराच्या नोकऱ्या सांगून आल्या होत्या. एका देशानं तर मला बहुमानपूर्वक नागरिकत्व देऊ केलं होतं. मला रामांच्या वचनानं वाचविलं, ' जन्मभूमी स्वर्गाहून श्रेष्ठ आहे ! '

दुःखाची गोष्ट अशी की माझ्या या निर्णयाबद्दल कितीतरी भारतीय महाभागांनी मलाच दोष दिला. आता मला सांगा, श्रीमंत पण दत्तक आई जन्मदात्या मातेची माया देऊ शकेल का ? मातृभूमीच्या आश्रयाखाली

पायदळाखालची ऊब परक्या देशाच्या शालीखाली कधीतरी लाभेल का?

रामांचा संदेश विसरणाऱ्या भारतपुत्रांना देशद्रोही म्हणणं आजच्या अंतराळयुगांत तसं कदाचित् अनुचित होईल. त्यांना काय म्हणावं ते तुम्हीच ठरवा झालं!

रामराजे अयोध्येला परतले, राज्याभिषेक थाटात झाला. रामसीतेचं सुखाचं वैवाहिक जीवन चालू झालं. पण त्या गोड दुधात मिठाचा खडा पडला. सीतेवर नसते आरोप ध्यायला, कुभांड रचायला काही विघ्नसंतोषी लोकांनी प्रारंभ केला. जगांत असली माणसं असायचीच. पण राम होते अशा मताचे की,

राजा प्रजारंजनात्।

राजानं प्रजेच्या सुखाकरता झटलं पाहिजे. प्रजेच्या मनाला त्यानं मान तुकविली पाहिजे. सीता ही राणी व्हायला पात्र नाही असा संशय प्रजेत वळावत आहे असं पाहताच त्यांनी सीतेचा त्याग केला. ज्या प्राणप्रिय सीतेची रावणाच्या जबड्यांतून सुटका केली, जिच्याकरता महायुद्ध लढविली, जिच्याकरता कोट्यवधि वानरसेना कामी आली त्या सीतेला रामांनी राज्याबाहेर हाकून लावलं. Ceaser's wife must be above suspicion असं इंग्रजीत म्हणतात. राज्यकर्त्याचं व त्याच्या पत्नीचं वर्तन फक्त चांगलं असून चालत नाही. ते चांगलंच आहे अशी प्रजेची मनोभावना असली पाहिजे!

रामांचा हा त्याग किती पराकोटीचा! स्वयंवरांत तिला जिंकलं. तिचंही प्रेम इतकं अद्वितीय की ती रामांबरोबर खडतर वनवासाला सिद्ध झाली! पतिपत्नींचं प्रेम इतकं अतुलनीय की त्याला तुलना सीतारामांच्या प्रेमाचीच. रामांचं एकपत्नीव्रत जगात गाजत आलं आहे. सीतेची गणना तर त्या अनिश्रेष्ठ पंचकन्यांत केली जाते.

अहल्या द्रौपदी सीता तारा मन्दोदरी तथा।
पंचकं ना स्मरेन्नित्यं महापातकनाशनम् ॥

अशा या प्रेमी युगुलाची पुन्हा एकदा ताटातूट झाली. का? तर रामांना कर्तव्यकठोर व्हायच होतं. का? तर प्रजेचं मन त्यांना सुखवायचं होतं. राम हे लोकाभिराम होते.

लोकाभिरामं रणरंगधीरं।
राजीवनेत्रं रघुवंशनाथम्॥
कारुण्यरूपं करुणाकरं तं,
श्रीरामचंद्रं शरणं प्रपद्ये॥

हे झालं रामांचं उदाहरण. आजकाल काही काही टीकाकार लोकशाही-करता टाहो फोडतात, पण त्याच वेळी रामाच्या या पत्नीत्यागावर कडाडून हल्ला चढवितात! हे खरे लोकशाहीचे भक्त की राम?

आज आम्ही अधिकारपदावर येताच सग्यासोयऱ्यांची, दोस्तांची, पक्ष-मित्रांची वर्णी सरकारदरबारी कुठं लावता येईल ते प्रथम पाहतो. तुम्ही पार्लमेंटात कांहीही बोला! वृत्तपत्रांत कितीही टीका करा! आम्ही म्हणतो, "एवढा चान्स मिळाल्यानंतर थोडीफार मेहरबानी कोणावर केली तर असं काय मोठं बिघडलं! आम्ही आमच्या बायकापोरांकरता तर जरूर बंगले बांधणार, पैसा करणार, मोटारी उडविणार!"

रामांची ही गोष्ट अशा पद्धतीनं मी आज मुद्दाम का सांगत आहे हे तुम्ही ओळखलं असेलच. रामायणाचं अध्ययन करणं, रामचरित्राची ओळख करून घेणं आज आम्हा भारतीयांना अत्यावश्यक आहे असं मला वाटतं. राम लोकाभिराम होते! लोकाभिराम असण्यातच शुद्ध लोकशाही सामावलेली नसते का?

रामनामाचा महिमा हा भारतीय संस्कृतीचाच एक अविभाज्य घटक का बनला आहे? हजारो साधुसंतांनी, लाखो कवींनी रामांचा असा ध्यास का घेतला? आद्यकवि वाल्मीकी, तुळसीदास, रामदास मुक्तकंठानं रामकीर्तीचं गायन का करतात?

राम एकवचनी, एकपत्नी, एकबाणी होते हे तर झालेच. ते शूर होते, प्रजारंजक होते! लोकशाही त्यांच्या रोमरोमांत भिनली होती. म. गांधींना आधुनिक भारतात रामराज्य हवं होतं; म्हणजेच त्यांना रामांसारखे शुद्ध चारित्र्याचे, सत्यप्रतीत, नेक, सत्यप्रिय, लोकशाहीप्रेमी राज्यकर्ते हवे होते. दुर्दैवानं आज भारतात असी काही 'जबाहिरं' आहेत, असे काही 'प्रशांत'

आहेत. रामचरित्र त्यांना अधिकाधिक भाग्यवंत करो! रामाचे असे सद्भाव-अनुयायी या भरतवर्षात निर्माण होवोत!

आपदामपहर्तारं दातारं सर्वसंपदाम्।
लोकाभिरामं श्रीरामं भूयो भूयो नमाम्यहम्॥

— अर्घ्य : ५ —

## एकश्लोकी रामायण

आदौ रामतपोवनादिगमनं हत्वा मृगं कांचनम्।
वैदेहीहरणं जटायुमरणं सुग्रीवसंभाषणम्॥
वालीनिर्दलनं समुद्रतरणं लंकापुरीदाहनम्।
पश्चाद्रावणकुंभकर्णहननमेतद्धि रामायणम्॥

## वाल्मीकींना वंदन

कूजन्तं रामरामेति मधुरं मधुराक्षरम्।
आरुह्य कविताशाखां वन्दे वाल्मीकिकोकिलम्॥

# स्वयंवर माझं मी मांडलं !

पाचशे माणसांना न उचलता येणारं अवजड शिवधनुष्य श्रीरामांनी लीलया उचललं एवढंच नव्हे तर दाणकन् मोडून टाकलं. शिवधनुष्य उचलणाऱ्या वीरपुरुषाला आपली सुरूप कन्या जानकी द्यायची असं जनक राजानं ठरवलं होतं. कितीतरी राजे आले नि गेले. सीतेला हवा होता महाविक्रमी पति !

आजही अशा अनेक सीता भारतांत नसतील का? आज धनुष्यबाणाचं महत्त्व उरलं नाही. आता अंतराळयुग चालू आहे. मानवानं 'न भूतो' अशी वैज्ञानिक प्रगति केली आहे. आजच्या भारतीय कन्यांना थोडं स्वातंत्र्य द्या, त्यांना मनमोकळेपणानं बोलू द्या ! 'स्थळं' शोधण्याकरता गावोगावी फिरण्यात 'जोडे' फाडून, वधूपरीक्षांचे बाजार मांडून त्यांना 'दावणत' कशाला फिरता ? रामांचे आपण वंशज ना ? राम सीतेला 'पाहायला' गेले नव्हते ! उलट सीतेनं रामांची 'वरपरीक्षा' अगोदर केली ! का हो तरुणमंडळी, असे दचकता का ? तुमची परीक्षा वधूनं घ्यायला काय हरकत आहे ? आधुनिक वधूला स्वयंवर साजरं करायची संधि देऊन तर पाहा, ती तुम्हाला रोकठोक भाषेत बहुधा असंच सांगेल :



— स्वयंवर माझं मी मांडलं

स्वयंवर माझं मी मांडलं !—

अंतराळयुगि हवं मला ग—
जगातलं अन् जगावेगळं !

नव्या युगातिल गवळण मी ग,
गोधन कुठलं ! कृष्ण कुठं ग !
रासरंग ग कोणासंगं ?

प्रियकर मजला हवा ग ज्याला–
ज्ञात सर्व अणुशास्त्रामधल!

रामासह पुष्पकी विमानी–
नको मधुरवच प्रेमगुजनी,
राज्य नको, वनवास काननी,

हवा ग प्रियकर नेइल मजला–
चद्रावरि जो मधुचद्राला!

हो, असले शास्त्रज्ञ, शूर, तरुण पति म्हणून हवे असतात आजच्या तरुणींनाही!

आम्ही खूप सुधारलो अस आज आम्हाला वाटत. तो रेडिओ, टेलेव्हिजन, ते अणुसशोधनकेंद्र, ते आमचे प्रचड कारखाने नि त्या अब्जावधींच धन खाणाऱ्या पचवार्षिक योजना .... ऐका ऐका!

एकदा गाडीत प्रवास करत असताना मी सहज विनोदाने म्हटल, "सामाजिक परिस्थितीचा विचार केला तर आम्ही अश्मयुगाच्याही पलीकडच्या कुठल्या तरी युगातच आहो की काय अस वाटत मला कधीकधी!"

एका तरुण सहप्रवाशाला माझ विधान भारी झोंबल नि त्यान मला भारतातल्या वैज्ञानिक प्रगति-योजनाची यादी ऐकविली. माझ विधान होत समाजस्थितीसबधी! आजही ते कायम बदललेल नाही!

हुडाबंदीचा कायदा, सुवर्णनियत्रण, सततिनियमन, काळा बाजार वगैरे अनेक विषयाचा परामर्ष घेऊन शेवटी आमच्या गप्पा आजच्या विवाहसमस्येपर्यंत येऊन ठेपल्या. मी म्हणालो, "आजच्या तरुणाना हुडा मागायची शरम कशी नाही वाटत? मॅट्रिक झालेल्या कारकुनाला कमीत कमी दोन हजार रुपये हुंडा हवा, बी. ए एम. ए चा दर चार हजाराच्या आसपास, एजिनीअर, डॉक्टर वगैरे मडळींचा बाजारभाव म्हणे दहापधरा हजाराच्याही वर! वकिलाची सद्दी नरमलीय म्हणतात प्रोफेसर-मास्तराचा भावही तेजीत आहे अशी वार्ता आहे सरकारन त्याचे पगार ठाकठीक केले आहेत नि शिवाय वनिकपुस्तकलेखन, 'गाइडस', शिकवण्या वगैरेतून त्याना वरीचशी पुजी [illegible] असावी। व्यापारी वर्ग व सरकारी नोकर यांची 'कोटेशन्स' फार

काढली आहेत! काळाबाजार नि 'करप्शन' यांच्या कर्मयोगात त्यांच्या तिजोऱ्यांची पोटं फुगून फुटूं लागली आहेत अशी कुणकुण आहे! या साऱ्या वरभ्रुवांना पंचवीसतीस हजारांचे हुंडे हवेत. सालंकृत कन्यादान तर प्रत्येकाला पाहिजेच!"

माझ्या तरुण मित्राचा चेहरा प्रथम जरा काळवंडला. नंतर लगेच नवा तजेला झळकला त्याच्या मुद्रेवर.

"माझीच गोष्ट सांगू तुम्हाला? मी आता गावी चाललो आहे एक वधू पाहायलाच!" त्यानं थंडपणानं सांगितलं, "अन् हेही सांगून टाकतो की मी भरपूर हुंडा घेणार आहे!"

"खरं म्हणता? केवढ्याला गंडविणार आहां वधूपित्याला?"

"पंचवीस हजारांच्या आत सौदा पटायचा नाही! शिवाय अलंकारांची मागणी आहे. मला उच्च शिक्षणाकरता परदेशी पाठविणाऱ्याला अधिक पसंती."

हसतहसत त्यानं आत्मचरित्राचा काही भाग ऐकविला. एका अणु-संशोधनकेंद्रात त्याला एक हजाराच्या आसपास पगार आहे. त्याचे वडील म्हणतात, "मी तुझ्या शिक्षणावर वीस हजार रुपये खर्चले तेवढे तरी यायला नकोत! शिवाय माझ्या मुलीच्या लग्नाच्या वेळी मला मला दहा हजारांचा हुंडा कुणी कमी नाही केला तो!"

असं आहे हें दुष्ट चक्र. ज्यांच्या मुलांची संख्या अधिक नि मुलींची कमी तो बाप भाग्यवान; कमेकडची बाजू फुगते. ज्याला मुलंमुली समान त्याचा तळेवंद बसावसा जमतो तरी. ज्याला कन्यारत्नंच अधिक त्याचं प्राक्तन फटीगच, आणि ज्याच्या घरी पोरीच पोरी त्याच्या नशीबाची दोरी तुटलीच म्हणून समजावं!

माझ्या सहप्रवाशाने मी म्हटल, "काय हो, तुमच्या सर्व मागण्या मान्य करणाऱ्या कोणत्याही मुलीला 'करून' घ्याल का?" "हो विसरलोच हं आणखीही एक अट आहे 'वस्तु' सुस्वरूप हवी!" त्यानं मख्खपणानं सांगितलं, "आजकाल झालय् काय की सुंदर पोरींच्या बापाजवळ पैसा नसतो नि श्रीमंत बापाच्या पोरी असतात कुरूप कुब्जा, शूर्पणखा! त्यामुळं तर आतापर्यंत मी हा असा ब्रह्मचारी राहिलो आहे ना! दात आहेत तर हरभरे नाहीत नि हरभरे आहेत तर दात नाहीत!"

रामायणकाली, महाभारतकाली असल्या प्रथा नव्हत्या. राजकन्या स्वयंवर करून आपणाला हवा तसला पति स्वतः निवडत कितीतरी कन्या स्वतःच पुरुषाला सांगत, "मी तुझ्यावर अनुरक्त झाले आहे ? माझ्याबरोबर लग्न कर!"

रुक्मिणीनं तर श्रीकृष्णाना इतकं सुंदर प्रेमपत्र लिहिलं आहे म्हणता ?

श्रोत्याचिया श्रवणरंध्रे रिघोनि चित्तीं।
तुझे गुण निविघ ताप हरी हरीती॥
पेखोनिया भुवन सुंदर या गुणाते।
निर्लज्ज चित्त हरि हें तुजला वरीतें॥

नुसती प्रीतिपत्रिका लिहूनच ही गोरागोमटी थांबली नाही, तिनं साफसाफ लिहून टाकलं, "मला पळवून ने! नाही तर माझ्याशी शिशुपाल लग्न करील, राक्षसविधीनं माझ्याशी तू लग्न कर!"

वा वा! आजचे वधूपिते म्हणत असावे, "ही जुनी पद्धत किती उत्तम आहे! रुक्मिणीदेवींनी घालून दिलेली व खुद्द भगवान् कृष्णानी आचरलेली!"

आजकाल तरुण पोरं आपल्या मुलींना प्रेमपत्रं लिहीत नाहीत म्हणून बाप तक्रार करतात म्हणे! पत्रोपत्री असे विवाह जमत असते तर पोस्टखात्यानं पत्राचे दर आणखी थोडे वाढविले तरी त्याची हरकत नाही. पण, आजच्या धीट मुलींनी रुक्मिणीप्रमाणं स्वतःच पत्रं पाठविली तरी त्यांचा उपयोग होत नाही पत्राबरोबर वित्त हुंड्याचा आकडा कळविला तरच अशा पत्राचा थोडाफार परिणाम होण्याचा संभव!

रुसवाफुगवा अमुचा क्षणभर,
कलह पळभरी स्नेह निरंतर
अश्रूंमागुनि हास्य मनोहर—
प्रपंचात फुलणार !

नश्वर म्हणुनि जगास निंदिती,
प्रपंच त्यजुनि मोक्ष वांछिती,
करिंचे हरुनी, मृगजळि बघती
देव तया हसणार !

मुलाचं नाव धृष्टद्युम्न, मुलीचं द्रौपदी. द्रौपदी श्यामला होती म्हणून तिला कृष्णा असंही म्हणतात. तिनं यौवनात प्रवेश करताच तिचं स्वयंवर जाहीर करण्यांत आलं. होय, त्या काळ्या पोरीचंही स्वयंवरच बरं का ! काळी पोर, बापाला घोर, अशी परिस्थिती नव्हती त्या वेळी. द्रुपदाला हवा होता महापराक्रमी शक्तिशाली जावई, धृष्टद्युम्नाला तसलाच मेव्हणा हवा होता, नि द्रौपदीलाही अशा तेजस्वी नि बलिष्ठ प्रियकराची आस होती की ज्याच्या विक्रमानं पृथ्वी चळचळ कापावी ! मुलगी एकदा कशी खपेल ही काळजी नव्हती बापाला, जावई आपल्या लेकीला शोभेल असा लाभेल की नाही याची होती !
स्वयंवराला अलोट गर्दी लोटली ।

राया द्रुपदाचे राजमंदिरी । सभा घनदाटी तये अवसरी । ब्राह्मणो कुळीचे राजे उभेभीतरी । बसले देखा ॥ बैसला असे भीष्मद्रोण । शकुनि आणि दुर्योधन । कर्ण रवींचा नंदन । अनुक्रमे बैसले ॥ वाद्ये वाजती नाना ध्वनी । गगन गर्जत असे निशाणी । भेरीचे नाद गर्जती तेणे मेदिनी । दणाणत असे ॥

—विष्णुदास नामा

दुर्योधनादिकांची फन्यारलीच लागली दृष्टि ।
दृष्टि जरि घातली त्याला तरि ती विरंचिची सृष्टि ॥

महाभारतकाली मुलींच्या बापामागं विवाहेच्छु तरुणांचा ससेमिरा असे, " मला तुमची मुलगी द्या म्हणून !" भावी सासरा म्हणे, " वेदाध्ययन केलं

असलस तर पहिली पायगी चढ, धडधाकट असशील तर दुसऱ्या पायरीला पाय लाव, गदायुद्धन्त्ला अवगत असेल तर तोंड उघट नि अचूक धनुर्विद्येत पारगत असशील तर स्वयंवराला हजर राहा. मग माझी मुलगी ठरवील, तू तिला अनुरूप आहेस की नाही ते!"

द्रुपदान असल जड धनुष्य ठेरल होत की ते उचलायला जाणाऱ्यान अगोदर आमहत्येची तयारी मनाशी केलेली असावी त्यातुन त्याचा वेध करायचा ते लक्ष्य सतत फिरणार! कर्णान धाडस करून ते धनुष्य उचलल मात्र, द्रौपदीन त्याला स्पष्ट भाषेत नकार देऊन टाकला.

"कर्ण हा चागल्या कुळातला नसल्यानं त्याला या स्वयंवरात भाग घेता येणार नाही. मी त्याचा स्वीकार करणार नाही!"

आजकाल तुम्हीआम्ही कितीतरी शालीनतेन वागतो नाही? आम्ही साळसूदपणान म्हणतो, "मुलीची पत्रिका जमत नाही हो!" द्रौपदी मात्र 'स्पष्ट' लाच तोंडावर स्वच्छ भाषेत आपला नकार ऐकवित्ते अस होत ते युग! आजच्या मुलींच्या दृष्टीन झकास नि तरुणाच्या दृष्टीन .. काय म्हणता तरुण मित्र हो, या जुन्या विवाहपद्धतीच पुनरुज्जीवन करू या का? तुम्ही नकोच म्हणणार! मुली मात्र नक्की म्हणतील, "आमचा संपूर्ण पाठिंबा आहे!" खर ना?

त्या मडपात जमलेल्या कोणालाही ते धनुष्यप्रकरण पेलल नाही अज्ञातवासात असलेले पाडवही त्या मडपात आले होते कपाळाला भस्म चोपडून भिक्षुवेशात ते तिथ बसले होते अर्जुन समोरा आला नि म्हणाला "मी करतो लक्ष्यवेध!"

ते वेळी तो कैसा गमला। जैसा खोपेतूनि सिंह निघाला।
की महाकाळु चालिला। भूतावरी जैसा॥ की तो प्रळय
काळीचा रुद्र। कोपला करावया संहार। की तो धोमला
वडिनृद? दश प्रजापतीवरी॥ रूप स्वरूप आतिसुदर। जैसा
मदनाचा अवतार। यौवनदयान्द शरीर। सोमतेने साजिरा॥

—विष्णुदास नामा

अर्जुनानं पहिल्याच तडाख्यात ते लक्ष्य उडविलं. द्रौपदीनं त्याला माळ घातली. जमलेल्या साऱ्या राजांना या अपमानाचा राग आला. त्यांनी शस्त्र उगारलं. तुंबळ लढाई झाली त्या मंडपात. अर्जुनाच्या मदतीला भीम आला, मग काय? साऱ्या राजांना पळता भुई थोडी झाली.

उगाचंच नेहमी तुलना करणं शहाणपणाचं ठरत नाही असं म्हणतात. नाहीतर आमच्या सध्याच्या लग्नमंडपांत गाजणारे विहीणकरवल्यांचे रुसवेफुगवे, मानापमान, खुद्द वरराजांचा स्कूटरकरता किंवा घड्याळाकरता चाललेला हट्ट यांचं वर्णन इथं अगदी शोभून दिसलं असतं. पराक्रम दाखवून द्रौपदीकडून माळ घालून घेणारा नि जिंकलेल्या बायकोकरता मंडपातच रणांगण गाजविणारा अर्जुन कुणीकडे नि पैशाच्या लाचेखातर मुलीला 'पसंत' करणारा हुंडावीर कुणीकडे! या लग्नाच्या बाजारातच नव्हे तर इतर सर्व क्षेत्रांतच सारं "करप्शन" (म्हणजेच 'करप्शन') दुर्गंधि माजवत आहे आजकाल. कलियुग आहे हे. जाऊ द्या झालं.

★

— या कलियुगाचा न्याय गडे !

उलटे सुलटे तिरपगडे
या कलियुगाचा न्याय गडे !

अंतराळिचा प्रवास करती,
चंद्रमंगळा दुर्बिण लाविती,
जन्म दिल्या धरणीस विसरती
तिला मात्र अणुबाँब तडे !

मुळास मुजरा मालक मिंधा,
नृपास पेन्शन, टग्यास चंदा,
भाई उलटे, सोटा धंदा !
पुंडगुंडची टरती बढे !

पोरा देती गादी सावध्या,
स्वजना लाठी भुमनें परक्या,
लेकी अप्रिय, सुना लाडक्या !
(पत्नी अप्रिय नटी लाडक्या !)
माया वाहे भरतीकडे !

द्रौपदीला व तिचे मानलेले बंधुराज श्रीकृष्ण यांना कोणाची माया अशी मलतीकडेच वाहणं पसंत नव्हतं. पांडवांचा अनन्वित छळ करायला सुरुवात केली कौरवांनी–खुद्द चुलत भावांनी! पांडवांना कपटद्यूतांत जिंकून त्यांनी त्यांच्या पत्नीचा, द्रौपदीचाही भर सभेत अपमान केला! द्रौपदीला तिच्या अंतःपुरातून फराफरा ओढत आणली दुःशासनानं.

ये राजसूयावभृथे जलेन महाक्रतौ मंत्रपूतेन सिक्ताः।
ते पांडवानां परिभूय वीर्यं बलान्परामृष्ट धृतराष्ट्रजेन ॥

ज्या केसांवर राजसूय यज्ञात मंत्रयुक्त जलाचा अभिषेक करण्यात आला होता त्या केसांचा दुःशासनानं अवमान केला. द्रौपदी म्हणाली, "दुःशासन भावोजी, मी रजस्वला आहे, एकवस्त्रा आहे, मला सभेत नेऊ नका!"

"अग दासी, तू एकवस्त्रा असलीस काय किंवा संपूर्ण विवस्त्र असलीस काय! मला काय त्याची चिंता?"

भारताच्या राणीचा केवढा हा अपमान. सीतेचा अपमान रावणानं केला होता. तसलाच हृदयाला घरं पाडणारा, त्वेषानं रक्त उसळविणारा हा अपमान नव्हे का?

द्रौपदीनं त्या दुष्टाला खणखणीत भाषेत बजावलं, "नराधमा, तू इतका घोर अपराध केला आहेस की आता तुझा अंतकाल फार दूर नाही!"

देवी म्हणे, 'अनार्या! नाहींच तुझ्या मनांत पापडर।
ओढ नको फरफरा, चेऊं दे सावरोनि हा पदर'॥
कृष्णा म्हणे, 'पति कसे पाहुनि हें कर्म साहतील? न या।
पड सर्वविरी, तुमच्या रक्ताच्या लाट वाहतील नद्या'॥
ओढुनि सभेत नेली, तेव्हां ती द्रौपदी म्हणे, "कुरुंची।
कीर्ति बुडाली हा! धिक् कुरुवृद्धांहि मानली कुरुंची॥
केला हो! केला हो! केला हो! सर्व सभ्य केला हो!
अधमय मोठें तुमच्या कुरुवंशाच्या न हानि मोठा हो!॥"

सभेत पाचही पांडव पत्नीचा अपमान मुकाट्यानं पाहत होते. भीष्म द्रोण, विदुरासारखी सज्जन मंडळी खाली मान घालून गप्प बसली होती!

Love at first sight ! प्रथमदर्शनी प्रेम ! भारतीय तरुणांना हे अगदी मान्य आहे. मात्र त्यांना दर्शन घ्यायला दोन वस्तु हव्या असतात, वधू आणि वधूपित्यांचं बँकबुक. बँकेतल्या आकड्याच्या प्रथमदर्शनानं जर त्या ' स्थळा 'चे डोळे आनंदानं विस्फारले तर तो वधूचं दर्शन घ्यायला तयार होईल असं मानायला हरकत नाही !

श्वशुरगृहीं वास करी, तो एक मूर्ख ! असं रामदास म्हणतात. सासऱ्याच्या संपत्तीवर नजर ठेवणाऱ्याला तर एका कवीनं अधमाधम असं म्हटलं आहे. श्रीमंत सासरा पटकावणं ही आजकाल एक नवी ऐट झाली आहे. पूर्वी स्वयंवर होई, आज ' स्वयंश्वशुर ' साजरं केलं जातं. म्हणजे वर दवंडी पिटतो, " मी अमुकतमुक उपवधू आहे. माझं वय इतकं, पगार इतका, माझं शिक्षण असं असं........!" म्हणजे असंच ! " माझ्या अपेक्षा : वधूची उंची साडेचार फुटांच्या आत असावी, मात्र ती नीटस, गोंडस, सुंदर, सुरेख, देखणी, रूपवान्, लांब आणि खरेखुरे काळे केस असलेली ( गंगावन नामंजूर ! ) असावी. तिचा गळा सुरेल असावा, नाक चाफेकळीप्रमाणं, डोळे टपोरे ( पण रागीट नकोत ), दात कुंदकळ्यांप्रमाणं ( म्हणजे काय ? कवि लोक असं म्हणतात खरं ), गाल गुलाबाप्रमाणं असावे......."

आणखी काही राहिलं का ?

" तिला पोहता यावं ( तिच्याजवळ मीही शिकेन ), सायकल चालविता यावी, नव्हे स्कूटर........नव्हे मोटर ( तिच्या बापाकडूनच तर वसूल करायची आहे ना ! ) "

सारं मुसळ केरात.......नव्हे हुंड्यांत ! मुख्य मुद्दा राहिला !

" टेंडर भरू इच्छिणाऱ्या वधूपित्यांनी पुढील अटींकडे विशेष लक्ष पुरवावं :

१ ) वराची छाती, उंची, रूप किंवा त्याचे इतर सद्गुण वगैरेविषयी चांभारचौकशा करू नयेत, २ ) सध्या सरकारी कायदे जिकीरीचे झाले असल्यानं ठरलेल्या हुंड्याची रक्कम आगाऊ रोख आणून द्यावी; रक्कम शक्य तो पाच, दोन किंवा एक रुपयाच्या नोटांत असाव्या. त्यावर कसल्या खुणा करू नयेत ! ३ ) हुंडा मिळाल्याबद्दल पावती मिळणार नाही व एकदा घेतलेली रक्कम पुन्हा परत केली जाणार नाही; ४ ) ठरलेले दागिने

वधूच्या अंगावर घालण्याकरता लग्नतारखेच्या अगोदर आठ दिवस आमच्या हाती आले पाहिजेत; चौदा कॅरटची लंगडी सबब चालणार नाही; शंभर नंबरी सोन्याचेच दागिने पाहिजेत; ५) आम्हाला ॲंबॅसडर किंवा तसल्याच प्रकारची, आमच्या पसंतीची मोटर भेट म्हणून द्यावी, ती चालविण्याचा दहा वर्षांचा खर्चही अगाऊ रोखीनं द्यावा; ६) आम्ही परदेशांत शिक्षण घेऊ इच्छितो; त्याकरता लागणारा सर्व खर्चही अगाऊ मिळावा; ७) टेंडर भरण्यापूर्वी वरील सर्व पैसे, दागिने, मोटार इ. आमच्याकडे हजर होणं आवश्यक आहे; ८) कोणाचं टेंडर मंजूर करणं, न करणं हे आमच्या मर्जीवर अवलंबून राहील; ९) ज्यांचं टेंडर नामंजूर होईल त्यांच्या रकमा व इतर माल खास जमा होईल; परत केला जाणार नाही; १०) टेंडर मंजूर झालेल्या मुलीशी लग्न केलेच तर तिला नांदविण्याची जबाबदारी आमच्यावर नाही, शिवाय आमच्या मनाला वाटल्यास आम्ही कायदेशीर घटस्फोट घेऊ शकतोच हे सुज्ञांना सांगणे नलगे! सर्वांस जाहीर व्हावे!"

खुद्द कृष्णाची धाकटी बहीण सुभद्रा हिच्या लग्नाचीही गोष्ट अशीच मनोरंजक वाटेल तुम्हाला. सुभद्रेचा दुसरा भाऊ बळराम यानं तिचं लग्न दुर्योधनाशी करण्याचा घाट घातला. अर्जुन त्या वेळी असाच तीर्थाटनास गेला असता त्याला ही बातमी समजली. सुभद्रेसारख्या अतिसुंदर रमणीवर, प्रियसखा श्रीकृष्ण याच्या भगिनीवर अर्जुन भाळलेला होता. होतीच तशी ती देखणी, लाखातली नव्हे – कोटीतली एक! कृष्णानं अर्जुनाला गुपचुप उत्तेजन दिलं. पण बळरामाच्या कडक पहाऱ्यातनं तिला पळवायची कशी?

कृष्णानंच एक नामी युक्ती सुचविली अन् अर्जुनानं ती अंमलात आणली. साधूचा वेष करून त्यानं बळरामाच्या राजवाड्यात प्रवेश केला. त्याच्या दिमतीला बळरामानं योजना केली सुभद्रेचीच. त्याला काय माहीत हा सज्जन दिसणारा ऋषि कपट करायला आला आहे म्हणून! अर्जुनानं आपली भूमिका तर अशी उत्कृष्ट वठविली म्हणता?

मौन, सदा एकाच स्थिति, साधु समाधि-योग, सुविरक्ती।
सविव न लोक-समाजी; ध्यानें पीराचि पार्थ-यति भक्ति॥

अर्जुनाचं आणि सुभद्रेचं असं रीतीनं जमलं. त्या नाटकी ऋषीनं तिला पळवूनच नेलं!

असं काही करा, म्हणून मी जर आता आमच्या तरुणांना म्हणालो तर ते मला वेड्यात काढतील! हे कृत्य असंस्कृतपणाचं ठरवितील. "केवढा हा विनयभंग!" असंही कुणी किंचाळेल.

पण यातली गोम वेगळीच आहे. श्रीकृष्णानं रुक्मिणी पळविली तेव्हा त्याला कुणी हुंडा दिला होता का? म्हणून त्यानं आपल्या वहिणीचं लग्न अशा रीतीनं फुकटांत पाडलं! ते बरोबरच आहे! "देणं नास्ति, घेणं नास्ति!" आमचं तसं कुठं आहे हो? कोणाची बहीण पळवून आणली तर भाऊ मनातनं खूषच होणार! अन् वर संस्कृतीचे धडे पाजून म्हणणार, "तुम्हाला आमचा दरवाजा बंद!" म्हणजे दिवाळसणाचीही आशा नको! कृष्णार्जुनांची उदाहरणं गिरवून आमचं कसं चालेल बरं? शिवाय त्यांची राज्यं साम्राज्यं होती. आयुष्यात चार जादा पैसे मिळविण्याची एकच एक संधि आम्हाला कदाचित् बोहल्याच्या निमित्तानंच मिळणार! तीही गमवायची म्हणता?

भारताच्या प्राचीन वाङ्मयांतील अनेक स्वयंवरआख्यानं किती बहुरंगी, गोड नि उद्बोधक आहेत. चुरचुरीत आहेत, उत्तान आहेत, ठिकठिकाणी गुदगुल्या करणारा शृंगार भरलेला आहे त्यांत. चंटाळवाणा ग्रंथ म्हणून महाभारतासारख्या वाङ्मयरत्नाकडे दुर्लक्ष करू नका! मात्र एवढंच करा; शृंगाररसाबरोबर वीररसाचाही मनःपूर्वक आस्वाद घ्या. "पाच पांडवांनी एकाच द्रौपदीला भार्या म्हणून कशी काय निवडली?" हा प्रश्न मोठ्या खुबीदार रीतीनं विचारून 'सभा जिंकली' या थाटात टाळ्या घेणाऱ्या आजच्या आधुनिक समाजसुधारकांनी महाभारत ज्या काळी घडलं त्याचाही मागोवा घ्यावा. दुसरं असं की—

तसं करायला, मी म्हणतो, द्रौपदीची कथाच ऐकू आपण सारांशानं!

एक आटपाट नगर होतं त्याचं नांव पांचाळपूर. पंचाल देशाची ती राजधानी. त्या देशाच्या राजाचं नांव द्रुपद. राजानं वीर्यशाली पुत्राच्या प्राप्तीसाठी एक मोठं यज्ञ अनुष्ठान केलं. अग्नीनंच त्याला एक पुत्र अर्पण केला. त्याचं वर्णन महाभारतकारांनी केलं आहे,

ज्वालावर्णो घोररूपः किरीटी वर्म चोत्तमम् ।
बिभ्रन्सखड्गः सशरो धनुष्मान्विनदन्मुहुः ॥

किरीट, चिलखत, धनुष्यबाण, खड्ग धारण केलेला, ज्वालेसारख्या

वर्णाचा, तेजस्वी रूपाचा एक कुमार अग्नीतून बाहेर पडला, त्याच्या पाठोपाठ त्या यज्ञवेदीतून एक कुमारीही आली. तिच्या रूपाचं वर्णन किती करावं! जणू मूर्तिमंत सौंदर्यच ते

सुभगा दर्शनीयांगी स्वसितायतलोचना।
श्यामा पद्मपलाशाक्षी नीलकुंचितमूर्धजा।
ताम्रतुंगनखी सुभ्रूश्चारुपीनपयोधरा॥
मानुषं विग्रहं कृत्वा साक्षादमरवर्णिनी।
नीलोत्पलसमो गंधो यस्याः क्रोशात्प्रधावति॥

तिचं देहसौंदर्य पाहत राहावं असं होतं, तिच्या कमळाप्रमाणं तिचे डोळे विशाल होते, धनुष्याकृति भिवया, काळेभोर केस, आकर्षक स्तनभाग, तांबडीलाल नखं यामुळं तिचं लावण्य मोहक दिसत होतं. मानवरूपानं साक्षात् देवताच जणू पृथ्वीवर आली होती. तिच्या देहाचा सुगंध निळ्या कमळाप्रमाणे असून तो आसमंतात कोसभर दरवळत होता!

पराक्रमी पुत्र, सुंदर कन्या, यांच्या सहवासात द्रुपद राजा अगदी सुखात होता. त्याचा संसार मजेत चालला होता. द्रुपदाची राणी जी गाणी गुणगुणत असे ती आज आपण कलियुगात म्हणतो इतकी छान आहेत असं नाही वाटत तुम्हाला?

★

## — सुंदर हा संसार
(भीमपलास, त्रिताल)

मधुर, शुभद, कीर्ति, मंगल सुखकर
सुंदर हा संसार॥
सख्या रे, सुंदर हा संसार!
नृपवर तू, मी राणी सुंदर,
चतुरा कन्या, पुत्र धुरंधर,
राजस सजले हे गृहमंदिर
कीर्ती घनसंभार!

द्रौपदी त्यांना विनवीत होती, "बोला हो बोला हो। बोला हो। सर्व सभ्य बोला हो। तुम्ही पाळता ते मौन या क्षणी योग्य नाही. त्यानं तुमच्या सुज्ञपणाला कलंक लागतो. तोंड उघडा, बोला काही तरी।"

सारे गप्प।

द्रौपदीनं त्यांचा धिक्कार केला,

धिगस्तु नष्टः खलु भारतानां धर्मस्तथा क्षत्रविदां च वृत्तम्।
यत्र ह्यतीतां कुरुधर्मवेलां प्रेक्षन्ति सर्वे कुरवः सभायाम्॥

भरतकुलातील या सर्वांचा धिक्कार असो। यांचा धर्म संपला. यांचं क्षत्रियत्व आटोपलं।

भाषेंत झालेलं नाही अशी भाषा या जगाच्या पाठीवर नसेल. युरोपातल्या माझ्या दहा वर्षांच्या प्रवासांत मी अशी कितीतरी भाषांतरं अनेक भाषांत पाहिली आहेत! भगवद्गीतेचा संदेश समजून घेण्याची उत्सुकता युरोपातील सर्व देशांत मला आढळून झाली. माझी स्वतःची भगवद्गीतेवरची व्याख्यानं प्रथम युरोपांत झालीं व तीही अशा जिज्ञासूंच्या आग्रहावरून!

काय आहे या भगवद्गीतेचा संदेश! थोडक्यांत तो असा सांगता येइल:

नियतं कुरु कर्म त्वं कर्म ज्यायो ह्यकर्मणः।
शरीरयात्रापि च ते न प्रसिद्ध्येदकर्मणः॥
सुखदुःखे समे कृत्वा लाभालाभौ जयाजयौ।
ततो युद्धाय युज्यस्व नैवं पापमवाप्स्यसि॥

तुझ्या धर्मानुसार तुझं कर्म तूं आचरत जा. कारण कर्म न करण्यापेक्षां ते करणं बरं. नाहीतर तुझा शरीरनिर्वाह देखील चालणार नाही!

सुखदुःख, लाभनुकसान, जयपराजय समान मानून नंतर लढायला लाग. यात तुला कसलंही पाप नाही.

कर्मण्येवाधिकारस्ते मा फलेषु कदाचन।
मा कर्मफलहेतुर्भूर्मा ते संगोऽस्त्वकर्मणि॥

कर्म करण्यापुरताच तुझा अधिकार आहे. फल मिळेल की नाही ही गोष्ट काही तुझ्या अधिकारातली नाही. म्हणून अमुक फल मिळालंच पाहिजे अशी वासना ठेवून काम करू नको, आणि कर्म करायचंच नाही असाही आग्रह ठेवू नको!

भगवान् श्रीकृष्णांनी अर्जुनाला किती सुंदर मार्गदर्शन केलं आहे पाहा

स्वे स्वे कर्मण्यभिरतः संसिद्धिं लभते नरः।
स्वकर्मनिरतः सिद्धिं यथा विंदति तच्छृणु॥
यतः प्रवृत्तिर्भूतानां येन सर्वमिदं ततम्।
स्वकर्मणा तमभ्यर्च्य सिद्धिं विंदति मानवः॥

ब्रह्मविद्येचा सुकाळु' केला तो गीतेवरची टीका— ज्ञानेश्वरी–लिहूनच. तेव्हा-पासून तो आजपर्यंत सारे मराठी कविपंडितही गीतातत्त्वज्ञानाला स्पर्श केल्या शिवाय आपल्या लेखनाला परिपूर्णता येत नाही असं मानत आले आहेत. लोकमान्य टिळकांनी तर मंडालेच्या कारागृहातील आपला काळ भगवद्गीता–रहस्य अथवा कर्मयोगशास्त्र' लिहिण्यात व्यतीत केला नि कर्मयोगाला एक नवीन चेतना दिली.

आपणाला कदाचित मौज वाटेल मी एक गोष्ट सांगितली तर. सुमारे चौदा वर्षांपूर्वी मी पॅरिसमध्ये असताना एका बड्या मेजवानीच्या प्रसंगी मला एक फ्रेंच वृद्धा भेटली. तिच्या माझ्या पुष्कळ वेळ गप्पा झाल्या. मध्येच ती एकदम म्हणाली, "तू इतकी वर्षं युरोपात राहणार असं म्हणतोस ते कशाकरता ?"

मला युरोपात कायकाय शिकण्याची इच्छा होती त्याचा मी पाढा वाचला : वृत्तव्यवसायशास्त्र, मुद्रण–प्रकाशन, प्रसिद्धीशास्त्र, प्रवासव्यवसाय-शास्त्र, प्रौढशिक्षण, आंतरराष्ट्रीय राजकारण वगैरे वगैरे.

तिनं मला उत्तेजन दिलं खरं पण तिचा सारा जोर होता एकाच गोष्टीवर : "आम्ही युरोपियन लोकांनीच खरं म्हणजे भारताला येऊन शिक-ण्यासारखं पुष्कळ आहे. तरुण माणसा, तू अगोदर भारताला परत जा ! ज्या देशानं जगाला भगवद्गीता दिली त्या देशाला आम्ही कसलं 'ज्ञान' देणार आहोत ! "

पुढं मला कळलं की अनेक भारतीय क्रांतिकारकांशी तिचा चांगला परिचय होता. तिनं आणखी एका विदारक सत्यावर प्रकाश टाकला. ती म्हणाली,

" तू पत्रकार आहेस तेव्हा एक गोष्ट प्रथम कर गीतेचा संदेश तुमच्या तरुण पिढीला जास्तीत जास्त प्रमाणात पोचव. अरे, अतिशय दुःखाची गोष्ट अशी की भारतातून उच्च शिक्षणाच्या नावाखाली परदेशाला येणाऱ्या तरुणांना शेक्सपीयरची नाटकं कदाचित पाठ असतील पण बहुतेकांना भगवद्गीतेचा नावापलीकडे फारसा परिचय असत नाही ! "

तिच्या या विधानाचा परिचय मला एकदा पुढं जर्मनीत आला. तिथं शिक्षणाकरता आलेला मुंबईचा एक तरुण चांगलं इंग्रजी बोले. त्याचं सगळंच शिक्षण इंग्रजी भाषेच्या माध्यमातून झालं होतं म्हणे. त्यामुळं मराठी मातृभाषा

त्याला 'बगामापुरती थोडी थोडीच' येत होती. त्याच्याजवळ मी एकदा भगवद्गीतेचा सहज उल्लेख केला तेव्हा त्यानं सांगितलं,

"आमच्या नेदरलँडमध्ये एक गीता असते, परंतु तिच्यं आडनाव भगवत नाही बद् भगवत! यस्, सर्टनली नॉट भगवत!"

भारतीय संस्कृतीचा इतपतच परिचय असलेले अक्षरशः शेकडो तरुण मला परदेशात भेटलेले आहेत. अशा सत्यकथाही मी एक रात्रभर सांगू शकेन.

पन्नाशी उलटलेले व दोनदा डॉक्टरेट घेतलेले एक जर्मन विद्वान् पंडित होमर मिलायरहून आठवड्यातून एकदा माझ्याकडे हांबुर्गला येत. कशाला? संस्कृत भाषेचा परिचय करून घ्यायला. कारण? त्यांना 'भगवद्गीता' मुळातनं वाचायची होती. मी त्यांना संस्कृतचा प्राथमिक परिचय करून दिला. पुढे कील शहरी त्यांनी आपला अभ्यास संस्कृत भाषेच्या एका जर्मन प्राध्यापकाच्या मदतीनं वाढविला. हे गृहस्थ अधूनमधून मला पत्राद्वारे प्रश्न विचारू लागले. एकदा तर त्यांनी मला संस्कृतमध्ये पत्र लिहिलं। धार्मिक स्वरूपाचं काम करणाऱ्या एका संघटनेत ते मोठ्या अधिकारपदावर आहेत. त्यांनी माझ्या व्याख्यानांचा एक मोठा दौराच आखला एकदा. विषय: "भगवद्गीता!"

जर्मन भाषेतून भगवद्गीता या विषयावर व्याख्याने! मी जरा घाबरलो.

"घाबरायचं काय कारण? तुम्ही तर जर्मन भाषेत नेहमीच व्याख्यानं देता...." त्यांनी मला धीर दिला.

"पण गीतेवर व्याख्यानं द्यायची.... तशी पूर्वतयारी करायला गीतेवरचे जर्मन भाषेतले मोठे तरी ग्रंथ वाचायला हवेत, नाही का?"

हो प्रश्न त्यांना अपेक्षितच होता. त्यांनी मला गीतेवरच्या जर्मन ग्रंथांची एक यादी दाखविली; दीडशेहून अधिक पुस्तकांची ती नावं वाचून माझी छाती अभिमानानं फुगली! माझे मित्र म्हणाले, "आणखीही अनेक जर्मन पुस्तकं आहेत गीतेवर, आमची ही मर्यादा!"

मी पाचसात पुस्तकं निवडली. माझी व्याख्यानं थोडोरुडे फारच उत्सुकतेने देशभर गाजली. त्यावर वृत्तपत्रातून तपशीलवार चर्चा होई.

Worms शहरी झालेल्या माझ्या व्याख्यानाला तर प्रमाणाबाहेर गर्दी

झाली. मार्टिन ल्यूथर या सिस्ती धर्मसुधारकाला न्यायालयापुढं खेचण्यात आलं होतं, ते याच नगरीत कस लोग आगे, तिथल माझ व्याख्यान अतिशयच रगल. कार्यक्रम आटोपल्याननर शेकडो श्रोत्यांनी मजजवळ येऊन, हस्तांदोलन-पूर्वक माझ अभिनंदन केल. अगदी शेवटी दोन मध्यमवयीन स्त्रिया आल्या माझ्याशी हस्तांदोलन केल त्यांनी, पण त्यांच्या तोंडून शब्द उमटले नाहीत. कंठातल्या कंठात दोन हुदके दडविले गेले हे मात्र मला कळल डोळ्यात अश्रू तरळलेले दिसले. माझ्या ते विशेष लक्षात राहिल.

दुसरे दिवशी मकाळी त्या मला भेटायला आल्या हॉटेलात मही उत्सुकता विशेषच वाटली.

" आम्ही दोघी मैत्रिणी आयुष्याला कंटाळलो होतो. काल मध्यरात्री आम्ही आत्महत्या करणार होतो त्यापूर्वी तुमच व्याख्यान ऐकायला अगदी सहज म्हणून आलो. एका भारतीय माणसाला पाहावं म्हणून. ' भगवद्‌गीता ' हे नावही आमच्या कानावरून गेलेलं नव्हतं. आत्महत्येपूर्वीचे चारदोन तास कुठतरी कादायचेच होते! तुमच व्याख्यान ऐकून आम्ही आमचा विचार बदलला.....आम्ही आज जिवत आहोत याच श्रेय तुम्हाला आहे आम्ही आता असला वेडा विचार पुन्हा कधीही मनात आणणार नाही भगवद्‌-गीतेतल्या कृष्णाच्या संदेशात आम्हाला नवी स्फूर्ति मिळाली आहे.... आम्ही कर्मयोग शिकलो आहो!"

जाण्यापूर्वी त्यांनी माझ्याशी हस्तांदोलन केल तेव्हा त्यांच्या डोळ्यांत अश्रुबिंदू चमकले! अन् माझ्याही!"

मी गीतेला केवळ स्पर्श केला. माझे अरसज्ञानी चार शब्द ते काय, पण त्यांनी गीतेतले सारे विचार सांगितले — अन् परिसाच्या स्पर्शाने जणु त्याच सोन झाल ! हय मला ज्ञानेशाच स्मरण झाल तर नवल ते काय ?

> श्रेय चातुर्य शहाणे झाले ।
> प्रमेय रुचीस आले ।
> आणि सौभाग्य पोसले ।
> सुखाचे एथ ॥

आपणासारख्या विद्वान् व बहुश्रुत श्रोत्यांना गीतेच माहात्म्य माझ्या-सारख्या त्या विषयातल्या अनधिकारी माणसान काय सांगाव ? पण माझ्या

अधिकाराचा प्रश्न येतोच कुठं? सबंध महाभारताविषयी बोलताना ज्ञानेश्वर म्हणतात,

"माधुर्यी मधुरता। शृंगारी सुरेखता। रूढपण उचिता। दिसे भले॥ म्हणऊनि महाभारती जें नाहीं। ते नोहेचि लोकी तिहीं। येणे कारणे म्हणिपे पाही। व्यासोच्छिष्ट जगत्रय॥

भगवद्गीतेबद्दल लिहिताना ते पुढे म्हणतात,

जे अद्वितीय उत्तम। पवित्रैक निरुपम। परम मंगलधाम। अवधारिजो॥ हे अपार कैसेनि कवळावे। महातेज कवणे धवळावे। गगन मुठी सुवावे। मशके केवि॥

पतिव्रतेनं पतीची कानउघाडणी एखाद्या वेळी कशा कठोर भाषेत करायची असते ते द्रौपदीपासून शिकावं. अज्ञातवासात असताना कीचकानं तिचा मानभंग केला होता.

भीमाला ती म्हणाली,

उत्तिष्ठोत्तिष्ठ किं शेषे भीमसेन यथा मृतः।
नामृतस्य हि पापीयान् भार्यामालभ्य जीवति॥

अहो भीमसेन, मुडद्याप्रमाणं स्वस्थ झोपून कसे राहिलात? उठा! दुरात्मे सोडून मेलेल्या माणसाच्या बायकोचीच अप्रतिष्ठा करू शकतात!

आपल्या तेजस्वी भाषणानं तिनं भीमाचं मन वळविलं: "अज्ञातवास संपल्यानंतर मग कीचकाचा समाचार घेऊ म्हणून वाट पहात बसाल तर मी तोपर्यंत कांही जिवंत राहणार नाही. त्या अधम कीचकाला अगोदर ठार मारा! दगडावर मातीचा घडा फोडावा त्याप्रमाणं त्याचे तुकडेतुकडे करा! मला अनंत यातना देणारा कीचक उद्या सूर्योदयाच्या आत मेलेला दिसला नाही तर मीच विषप्राशन करीन!"

भीमानं कीचकाच्या मांसाचा लाळागोळा केला तेव्हा द्रौपदी तिथंच होती! कौरवांच्या बरोबर तडजोडीच्या वाटाघाटी करायला निघालेल्या श्रीकृष्णांना द्रौपदीनं आपले केस दाखविले, दुःशासनानं अपमानित केलेले. ती म्हणाली,

अयं ते पुंडरीकाक्ष दुःशासनकरोद्धृतः।
स्मर्तव्यः सर्वकार्येषु परेषां संधिमिच्छता॥

सारी बोलणी करताना या गोष्टीचं हं स्मरण ठेव!

पंचाल, यादव, पांडव जिवंत असता मला दुःशासनानं भर सभेत फरफटत आणलं होतं. हे कमलनयना कृष्णा, माझी सर्व दुःखं तू जाणतोस! मला ' दासी ' म्हणणारा दुर्योधन क्षणभरही जिवंत राहू शकत असेल तर या माझ्या पतींच्या बळाचा काय उपयोग?

धिक् पार्थस्य धनुष्मत्तां भीमसेनस्य धिग्बलम्।
यत्र दुर्योधनः कृष्ण मुहूर्तमपि जीवति॥

अर्जुनाच्या धनुष्यशक्तीचा आणि भीमाच्या सामर्थ्याचा धिक्कार असो. दुर्योधन घडीभर तरी कसा जिवंत राहू शकतो?

द्रौपदीमुळं महाभारत घडलं. त्या महाभारतात कर्मविद्येचं, ज्ञानाचं, भक्तीचं भांडार शिगोशिग भरलं आहे. भगवद्गीता हा त्या अमोल ग्रंथाचाच एक भाग. श्रीकृष्णांची ही भगिनीही त्यांच्याइतकीच थोर होती, कर्मयोगाचा अर्थ तिलाही चांगला कळून होता.

पांडव अज्ञातवासांत असताना अधम कीचकानं द्रौपदीचा एकदा अपमान केला. तिनं युधिष्ठिराजवळ तक्रार केली तेव्हा त्यानं तिला सांगितलं, " थोडी वाट पाहा! " त्यावर द्रौपदी ताडकन् म्हणाली, " तुमच्यासारख्या कनालीच्या दयाशील माणसाची मी पत्नी झाले, हे दुर्दैवच म्हणायचं! बाकी तुमच्या-सारख्या द्यूतव्यसनांत रमणाऱ्या माणसाची पत्नी झाल्यावर माझ्या पदरांत अपमान व विटंबनाच पडणार म्हणा या जगांत! "

क्षत्रियधर्म सांगताना द्रौपदीनं काढलेले उद्गार तर आज आम्ही आमच्या हृदयपटावर कोरून ठेवले पाहिजेत!

क्षत्रियेण हि हन्तव्यः क्षत्रियो लोभमास्थितः।
अक्षत्रियो वा दाशार्ह स्वधर्ममनुतिष्ठता॥
यो न दर्शयते तेजः क्षत्रियः काल आगते।
सर्वभूतानि तं पार्थ सदा परिभवन्त्युत॥

क्षत्रिय असो वा अक्षत्रिय असो, त्यानं जर दुष्ट लोभ चालविला असेल तर धर्मनिष्ठ क्षत्रियानं त्याला शासन केलंच पाहिजे. हे कुंतीपुत्रा, कालानुसार अवश्य असं क्षात्रतेज जो क्षत्रिय प्रकट करत नाही त्याचा सर्वांकडून नेहमी अपमानच होत असतो!

अधम, अधर्मी, कृतघ्न नीच लोकांच्याबद्दल द्रौपदीला क्षमा माहीत नव्हती. तिच्या भावाला, श्रीकृष्णालाही अशांनी दया दाखविणं मान्य नव्हतं. त्या भावानं बहिणीला प्रतिज्ञेची भाऊबीज घातली.

तामुवाच महाबाहुः केशवः परिसान्त्वयन् ।
अचिराद् रक्ष्यसे कृष्णे रुदतीर्भरतस्त्रियः ॥
चलेद्धि हिमवान् शैलो मेदिनी शतधा फलेत् ।
द्यौः पतेच्च सनक्षत्रा न मे मोघं वचो भवेत् ॥

द्रौपदीचं सांत्वन करत महाबाहु केशव म्हणाले, " साऱ्या कौरव स्त्रिया अशाच रडत, शोक करत असलेल्या दिसतील तुला लवकरच ! हे द्रौपदी, हिमाचलही कदाचित् आपली जागा सोडील, पृथ्वीची शेकडो शकलं पडतील, नक्षत्रासहित स्वर्गही एखाद्या वेळी खाली येईल, परंतु माझी वाणी कधीही खोटी ठरणार नाही ! "

महाभारत घडविणारी, भगवद्गीता वदविणारी, पांडवांना स्वकर्माप्रत सुरविणारी द्रौपदी ही अशी होती. स्वकर्तव्याची जाणीव होताच कौरवांसारख्या शत्रूंचं निर्दालन करणारे पांडवही शूर वीर होते. स्वतःच्या अपूर्व तेजानं, ओजानं, पराक्रमानं त्यांनी द्रौपदीला सुखविलं, प्रजेला अभय दिलं नि अखिल भारतांत एका वैभवशाली पर्वाची मुहूर्तमेढ रोविली !

पांच पतींना वरणाऱ्या द्रौपदीची अधूनमधून चेष्टा करणाऱ्या आधुनिक टीकाकारांना एवढंच सांगावसं वाटतं की असे महापराक्रमी पाच पांडव बंधु आज पुढं निर्माण झाले तर ते कदाचित् पुन्हा एकाच द्रौपदीशी लग्न करतीलही ! बलाढ्य वीरांना नि वीर स्त्रियांना तुम्ही आम्ही कोण अडविणार ? नि आम्ही अडविलो म्हटलं तर आम्हाला कोण जुमानणार ?

मी म्हणतो, इतकी महाविक्रमी प्रजा तर भारतात अगोदर निपजू दे ! त्यांची लग्नं मग कशा पद्धतीनं ठरवायची ते नंतर पाहता येईल. मात्र जरच्या ऐरा-गैरांना असली नवी पिढी नकोच असणार म्हणा !

— अर्घ्य : ६ —

# शिवकल्याण राजा

आमच्या देवांचं मला राहून राहून कौतुक वाटतं. सारे देव कसे शस्त्रास्त्रांनी सिद्ध असतात. अहो देवतासुद्धा! एकदा सर्व देवांची चित्रं तर पाहा!

श्रीभगवान् विष्णूचं हे वर्णन वाचा.

गदी शंखी चक्री विमलवनमाली स्थिररुचि ।
शरण्ये लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषय ॥

शंख, चक्र, गदा इ. हत्यारं श्री विष्णूच्या अंगाखांद्यावर सतत असायचीच. रामावतारात त्यांनी धनुष्यबाण जवळ बाळगले. महादेव तर अत्यंत प्रखर शस्त्रांशिवाय कधी कुठं दिसायचेच नाहीत. शिवाय कंठात जहाल विष. गळ्याभोवती नागाचा विळखा नि जटेत गंगा. तांडवनृत्याखाली सहजासहजी दोनचार दैत्य चिरडून टाकणं हा त्यांच्या पायाचा मळ. शंकरानी तृतीय नेत्र उघडला तर अवघ्या विश्वाची राखरांगोळी व्हायची भीती!

मंगलमूर्ति गजाननदेखील चारदोन शस्त्रं बाळगतानच. प्रत्येकाचं काहीतरी वाहन दिमतीला तयार असतंच, विष्णूंनी गरुडाची योजना केली आहे तर महादेवांनी नंदीची. गणपतीसारख्या स्थूल लंबोदराना एक उंदीरच कसा काय पुरत असेल हे त्यांचं त्यानाच माहीत. पण तेही शस्त्र व वाहनांनी नेहमी सज्ज असत. या आपल्या पुराणकालीन गोष्टी कसल्या सांगता, असं म्हणाल तुम्ही.

पण आज तरी काय चाललंय? साऱ्या राष्ट्रांच्या जमाखर्चाचे वार्षिक ताळेबंद सहज अभ्यासा ना! सांस्कृतिक कार्यांवर होणारे खर्च फुसकळ्या एक टक्क्याही असत नाहीत. पण संरक्षणखात्याला मात्र पन्नास ते साठ टक्क्यांपर्यंत पैसा देणारी राष्ट्रं कितीतरी. साऱ्या देशांत संरक्षणमंत्री असतात, कुठे-

कुठं त्याला चोख भाषेत युद्धमंत्रि ही संज्ञा असते. 'शांति-मंत्रि' किंवा Minister for Peace ही जागा मात्र एकाही देशाच्या मंत्रिमंडळात नाही !

सशक्त असणारा देश आपोआपच बलवान् ठरतो. त्याला जगात मानमान्यता मिळते. 'अबलांना विचारतो कोण ?

शक्तीने पावती सुखे। शक्ति नसता विटंबना। शक्तीने नेटका प्राणी। वैभवे मोगिता दिसे ॥ केवळ पुसे अशक्ताला। रोगीसे बराडी दिसे। शक्ति तो सर्व हि सुखे। शक्ती आनंद भोगती॥ सार संसार शक्तीने। शक्तीने शक्ती भोगिजे। शक्ती तो सर्व भोगी। शक्तीवीण दरिद्रता ॥ शक्तीने मिळती राज्ये। युक्तीने येत्न होतसे। शक्ती युक्ती जये ठायीं। तेथे श्रीमंत धावती ॥ मुक्त केल्या देव कोटी। सर्व ही शक्तीच्या बळे। समर्थ भवानी माता। समर्थां वर दीधला ॥ शक्तीवीण कोण आहे। हें तो विचारून पाहे। शक्तीविरहित न राहे। येश कीर्ति प्रताप ॥

आज अमेरिकेला नि रशियाला जगांत एवढा मान का? दोघेही शक्तिवान् म्हणूनच ना? लक्ष्मीही त्यांच्यावर प्रसन्न आहेच.

भारतानं अहिंसा हाच परम धर्म मानून एकेकाळी त्या तत्वाचा अतिरेक केला नि उत्तरेकडच्या चोर, दरोडेखोर, खुनी लोकांचे हल्ले दिवसा-ढवळ्या आमच्या देशावर होऊ लागले. इ. स. ७११ पासून पुढं जवळजवळ आठशे वर्षेपर्यंत परकीय लुटारूंना यशस्वीपणानं थोपवून धरणारा पराक्रमी वीर पुरुष झालाच नाही. दुबळ व दीनहीन स्थितीतल्या त्यावेळच्या भरत-भूमीचं वर्णन एकनाथांनी केलं आहे,

ऐशिये वर्तता मोहस्थिति। पूर्ण कळीची होय प्रवृत्ति॥ तेव्हा नीच ते राजे होती। प्रजा नागविती चोरप्राय ॥ अपराधेविण विनंड। भले त्यासी करिती दंड॥ गिरया करिती दंड। करिती उदंड सर्वापहरण ॥

अशक्त माणसाला चोर लुबाडतात. धन गेलं म्हणजे जगांत त्याला काही किंमत राहात नाही हा आपला नेहमीचाच अनुभव आहे.

त्यजन्ति मित्राणि धनैर्विहीनं पुत्राश्च दाराश्च सुहृज्जनाश्च ।
समर्थमर्थं पुनराश्रयन्ति ह्यर्थोहि लोके पुरुषस्य बन्धुः ॥



## — रुपया छन् छन् ! म्हणतो धन धन

रुपया छन् छन् ! म्हणतो धन धन
मानव जीवनि धन संजीवन !

भुते भोंवती उठता पंक्ती,
मानपत्र, अन् माळा कंठी,
वृत्तपत्रिही कीर्ति दिगंती,
रुणुरुणु रुंजति भंवती पंजण !

साधु, संत, किति सगेसोयरे,
'संस्था' 'मंडळ' 'समाज' सारे,
विनम्र दानास्तव सामोरे,
स्तुतिस्तवनाचे चाले गायन !

निघे दिवाळे दुर्दैवाने,
कुणी पुसे ना मग प्रेमाने,
कठीण साधी ओळख पटणें
सज्जन ठरतो क्षणात दुर्जन !
कलियुगातिल नीतीवर्तन !

भुते भोवती उठना पंक्ती ! सर्वे गुणाः कांचनमाश्रयन्ति, असं कवि म्हणतात त्याच प्रत्यतर आपणाला रोज येत आहेच. धन संपलं म्हणजे मग ऋण काढावं लागतं ! आमचं सरकार त्याचा अनुभव घेन आहेच. सुवर्णभूमीवर ही पाळी का आली ? आम्ही बेसावध राहिलों नि जगानं आम्हाला लुटलं म्हणून ! आम्ही चव्वेचाळीस कोटि भारतीय ! निसर्गानं आम्हाला भरपूर संपत्ति दिली आहे, देशाचं हवामान उत्तम आहे, आम्ही बुद्धिमान् तर निश्चितच आहोत. पण सध्या आम्ही अरथ्या चाळीसपन्नास लाख लोकवस्तीच्या चिमुकल्या देशाकडे देखील भिकेची झोळी घेऊन जात आहो ! जगभर आमची शिष्टमंडळं कशाकरता जातात ? मुख्यतः कर्ज मागायला ! आमच्या वर्तमान-

पत्रांत छापून येणारे फोटो जरा काळजीपूर्वक पाहात चला. कर्जांच्या करारावर सह्या करत आमचे सरकारी प्रतिनिधी किती ऐटीनं बसलेले असतात! धनकोंना असल्या फोटोंची जरुरी असते, पुरावा म्हणून! असली चित्रं जगभर छापली म्हणजे धनकोंचा रुबाब वाढतो, पण ऋणकोला मात्र त्यात कमीपणाच वाटायला हवा! त्या करारावर सही करताना डोळ्यांतून लज्जेची टिपं गळायला पाहिजेत। आमचे पुष्कळ मुत्सद्दी आनंदानं हसताना दिसतात!

केव्हा फेडणार आम्ही ही कर्जं? पुढची पिढी आम्हाला काय म्हणेल? 'ऋणकर्ता पिता शत्रुः' असं म्हणतात! एकेका सावकाराची नातेवाईक मंडळी भारताला भेट द्यायला येतात तेव्हा त्यांचा रुबाब मग काय विचारावा? त्यांचे दौरे आखण्यातच त्यांच्याकडून घेतलेली कर्जं संपून जायची एखाद्या वेळी! त्यांचे आदरसत्कार, मानमरातब, मानपत्रसमारंभ करण्यांत आमचा केवढा वेळ जातो. अन् शेवटी त्यांचंच नाक नेहमी वर. कारण आम्ही त्यांचे कर्जदार आहोत. त्यांच्याशी अदबीनं वागलंच पाहिजे! भारी केविलवाणी स्थिति असते हो कर्जात बुडालेल्यांची! अशक्तांचीही तशीच. त्याला येता जाता कुणीही चपराक द्यावी!

अशाच थपडा खात बसला होता भारत इ. स. सातशेपासून. पण शेवटी एका तेजस्वी, तपस्वी, महत्वाकांक्षी मातेची तपश्चर्या फळाला आली. तिच्या नवसाला देवी पावली.१६३० च्या फेब्रुवारीत शिवबाळ जन्माला आले.

शिवाजी महाराजांनी केवढ्या प्रतिकूल परिस्थितीत आपल्या स्वराज्य-कार्याला प्रारंभ केला. रानोमाळ हिंडून मर्द मावळ्यांची सेना त्यांनी अल्पवयातच खडी केली. तुकाराम, रामदासांसारखे थोर साधु त्याच काळी जन्मले ही केवढी भाग्याची गोष्ट. "मराठा तितुका मेळवावा। महाराष्ट्रधर्म वाढवावा!" याच एका ध्येयानं हे तीनही पुरुषश्रेष्ठ प्रेरित झाले होते.

साधनं वेगवेगळी होती, पण सर्वांचं साध्य एकच होतं; महाराष्ट्रांत, भारतात एका आनंदवनभुवनाची प्रतिष्ठापना करणं! भक्तिमार्गाचा प्रसार करून तुकाराम जनतेची एकी साधत होते : एकमेका सहाय्य करूं। अवघे धरू सुपंथ! समर्थांनी बारा वर्षं वणवण हिंडून देशस्थितीचा अभ्यास केला. काय आढळलं त्यांना? ऐका त्यांच्या भाषत; "जन बुडाले बुडाले। पोटेवीण गेले॥ बहुत फटले कष्टले। कितीएक मेले॥ त्यांनी नवनवीन प्रचार-

धर्म शोधून लोकांत जागृतिकार्य सुरू केलं, गावोगावी मारुतीची देवळं स्थापन केली, जनतेत सत्कार्याची भावना रुजविली, "केल्याने होत आहे रे। आधी केलेचि पाहिजे॥ यत्न तो देव जाणावा!" हा मंत्र त्यांनी मनोमन रुजविला. रामदासांनी लोकांच्या तोंडी बसविलेल्या मारुतीच्या आरतीचा अर्थ तरी पहा: शुद्ध राजकीय प्रचार आहे तिच्यात. शत्रूविरुद्ध उठाव करण्यास चेतावणी दिली आहे रामदासांनी!

सत्राणे उड्डाणे हुंकार वदनी। करि डळमळ भूमंडळ सिंधूजळ गगनी॥ कडाडिले ब्रह्मांड धाके त्रिभुवनी। सुरवर नर निशाचर त्या झाल्या पळणी॥ जयदेव जयदेव जय जय हनुमंता। तुमचेनि प्रसादे न भिये कृतांता॥

आरतीच्या शेवटी ते म्हणतात, "रामी रामदासा शक्तीचा शोध!" मारुतिस्तोत्रात तर ते म्हणतात, "कोटिच्या कोटि उड्डाणे झेपावे उत्तरेकडे." उत्तरेकडून शत्रू येत होते ना भारतावर!

आजकाल चार बुद्धिमान् लोकांचे पाच पक्ष नि दहा उपपक्ष असतात. तुकाराम–रामदासांनी मात्र शिवप्रभूच्या एकाच स्वपक्षाला संपूर्ण सहकार्य दिलं. रामांनी वानरांचं सहकार्य घेऊन रावणाचा उच्छेद केला. शिवाजी महाराजांनी मोठ्या मावळ्या मावळ्यांच्या सहकार्यानं शूर सेना उभारल्या नि महाबलाढ्य विजापूरकर, मोंगलांसारख्या शत्रूंना धूळ चारली. बेकीनं बज-बजलेल्या, तुटलेल्या, फुटलेल्या महाराष्ट्राचं ऐक्य साधलं नि 'आनंदभुवना'चा ध्वज आकाशात डौलानं फडकू लागला! काय सुयोग होता पहा! शिवराय सिंहासनाधीश्वर झाले त्या समयाचं नावही होतं, "आनंदनाम संवत्सर!"

समर्थ हर्षनिर्भर होऊन उद्गारले,

"बुडाला औरंग्या पापी म्लेंच्छसंहार जाहला॥ मोडिली मांडिली क्षेत्रे। आनंदवनभुवनी॥ बुडाले सर्व ही पापी हिंदुस्थान बळावले। अभक्तांचा क्षयो झाला आनंदवनभुवनी॥

शिवरायाला लिहिलेल्या एका पत्रात समर्थांनी त्यांचं गुणगायन किती समर्पक भाषेत केलं आहे

निश्चयाचा महामेरू। बहुत जनांसि आधारू॥
अखंड स्थितीचा निर्धारु। श्रीमंत योगी॥
या भूमंडळाच्या ठायी। धर्म रक्षी ऐसा नाही॥
महाराष्ट्रधर्म राहिला काही। तुम्हांकरिता॥

कित्येक दुष्ट संहारिले । कित्येकास धाक सुटले ॥
कित्येकासि आश्रय जाले । शिवकल्याण राजा ॥
सर्वज्ञ मंडळी धर्ममूर्ति । सांगणे काय तुम्हांप्रती ॥
धर्मस्थापनेची कीर्ती । सांभाळली पाहिजे ॥

भारतात ठाण देऊन बसलेल्या औरंगजेबासारख्या बादशहालादेखील शिवाजीमहाराजांची जरब बसली. स्वातंत्र्याच्या, स्वराज्याच्या सुखात महाराष्ट्र डोलू लागला. अखिल भारतवर्षाला शत्रूच्या जोखडाखाढून सोडविण्याच्या विचाराला महाराज लागले. त्यांचं अष्टप्रधानमंडळ तर दृष्ट लागण्यासारखं होतं! अवघे आठच मंत्रि होते! शूर, चतुर, कर्तव्यतत्पर, त्यागी! प्रसंग पडला म्हणजे हातात तलवार घेऊन स्वतःच स्वारीला निघत. खुद्द राजाच जिथं तळहातात शिरं घेऊन देशसेवेकरता प्रजारक्षणाकरता रणांगणावर जाई तिथं मंत्र्याचं काय? महाराष्ट्रात फुललेल्या आनंदवनभुवनाचा सुगंध भारताच्या दशदिशेला पसरत होता. सारा देशच आसुसला होता आनंदवनभुवन होण्याकरता!

पण काळानं अगदी अकाली महाराजांवर झडप घातली. निधनसमयी त्यांची पन्नाशी नुकतीच कुठं उलटली होती!

सहकाराचा कर्मयोग आचरून शिवाजी महाराजांनी देशभर प्रचंड जागृति केली होती; देशभर युयुत्सुवृत्ति, ऐक्य, सुख नांदत होतं. पण भारताला कोणाची तरी दृष्ट लागली; हळूहळू आमच्यात दुही वाढू लागली. पेशव्यांना ऐक्य टिकविता आलं नाही. मराठे सरदारांत दुफळी वाढली. १९१८ साली भारत सर्वस्वी परक्या सत्तेच्या – इंग्रजांच्या ताब्यात गेला.

१९४७ मध्ये पुन्हा भारतात स्वातंत्र्यसूर्य उगवला. हे स्वातंत्र्य पदरी पाडून घेण्याकरता सहस्रावधि वीरांनी प्राण पणाला लावले! अगदी अलीकडच्या काळात लो. बाळ गंगाधर टिळक यांनी लोकसंग्रहाचा मंत्र धावरला. कर्मयोगाचे कट्टे प्रचारक होते ते. म. गांधींनी तर जनतेत सहकाराची प्रचंड लाट उसळविली. कशाकरता तर इंग्रजांशी असहकार करण्याकरता! महात्माजींनी पं. जवाहरलाल नेहरू, कै. वल्लभभाई पटेल, श्री. राजगोपालाचारी यांच्यासारख्या अनेक तेजस्वी नररत्नांची माळ गुंफली!

स्वातंत्र्यप्राप्तीनंतर आम्ही आताशा कुठं आमचं घर शिस्तीत लावायला लागलो होतो तोवर आमच्या पवित्र हिमालयावर आक्रमण झालं. आमचे

वीर देशरक्षणाकरता धावले—हिमालयाच्या दिशेन! अनवाणी, उघडे, उपाशी! शत्रूला वाटलं होत, भारतात अनेक धर्म, जाति, पंथ, पक्ष आहेत! त्याच्यातल्या श्रीमन्त-गरीब लोकांत झगडे चालेले असतात! राज्यकर्त्यांवर लोक नाखूष आहेत, त्याच्यात बेदिली आहे. याना आपण सहज जिंकू, हा हां म्हणता भारताला पदाक्रांत करू!

शत्रू एकच गोष्ट विसरला की सारे भारतीय रामाचे, कृष्णाचे, शिवाजीचे वंशज आहेत लो टिळक, म गांधी, सुभाषचन्द्र बोस यांचे अनुयायी आहेत. सहकारी कर्मयोगावर आधारलेल्या प्रचंड पंचवार्षिक योजना कशा यशस्वी करायच्या हें त्याना शिकविणारे जवाहर त्यांच्या मार्गदर्शनासाठी आहेत, हिमालयावरच शिवताडव नृत्य शत्रूला कम दाखवायच ते जाणणारे "यशवंत" ही आहेतच आहेत

प्रेमाच घरदार, मायेचे मातापिते, जिवाची सखी, लडिवाळ बाळ याचा वियोग सहन करून आमचे सहस्त्रावधि तरुण मर्द हिमालयाच्या छातीला धीराच आलिंगन देत आहेत. कुणाच्या घरी पहिल्याच पुत्राचा नामकरण-समारंभ असेल, कुणी बोहल्यावरून नुकताच खाली उतरला असेल तर कुणाच्या साखरपुड्याची तयारी चालली असेल!

★

## —गुणगुणत गाणी प्रणयाची!

गुणगुणत गाणि प्रणयाची,
बनविली वाट नयनाची!

हिमगिरी मराठा फौजा
किति दूर जिवलगा राजा,
कधि येशिल, होशिल माझा?
लागली आस भेटीची!

दिनरात स्फोट तोफांचे!
उपवासी धरिशी मोर्चे,
तुज पांघरूण वर्फाचे!
मज उबग इथें सौख्याची!

अपुरेंच प्रीतिचें पत्र,
अतृप्त ओठ, कर, नेत्र,
गुंफिले न मंगलसूत्र,
सांगता कधी प्रेमाची ?

सांगता कधी प्रेमाची? खरंच कधी? तुमचं आमचं वैयक्तिक प्रेम सांगतेची वाट पाहात आहे. अगदी साहजिक. भारतमाताही तसल्याच प्रीतीच्या पूर्तीची प्रतीक्षा करत आहे. भारतमाता म्हणजे कोण? तुम्हीआम्हीच, देव! जनतेला जनार्दन म्हणतात. तेच आम्ही चव्वेचाळीस कोटि देव! आमचे स्वर्गलोकीचे देवही अधूनमधून भांडतात. कीर्तनकार, आद्यपत्रकार नारदमुनीच तर वेळोवेळी त्यांची भांडणं लावतात ना! पण देवलोकावर संकट आलं म्हणजे सारे कसे एक होतात, सहकारी कर्मयोग आचरतात! आपणही भारतभूमीवरचे देवच. देवांप्रमाणे भांडू या, — जरूर भांडू! लोकशाहीत वाद हा व्हायचाच! पण अरिष्ट येईल तेव्हां एक होऊ! सहकारी भावनेनं कर्मयोगी बनू!

सहनाववतु। सहनौ भुनक्तु। सहवीर्यं करवावहै।
तेजस्विनावधीतमस्तु मा विद्विषावहै॥ (कठोपनिषद्)

आपण एकत्र येऊ, एकत्र भोजन करू, ऐक्य साधून पराक्रम करू, तेजस्वी होऊ! एकमेकाबद्दल द्वेष न बाळगू!

भद्रं कर्णेभिः शृणुयाम देवाः पश्येमाक्षभिर्यजत्राः।
स्थिरैरंगैस्तुष्टुवांसस्तनूभिर्व्यशेम देवहितं यदायुः॥

—ऋग्वेद.

आम्ही कानानी मंगलच ऐकू व डोळ्यानी मंगलच पाहू. शरीर सुदृढ करून आयुष्याचा आनंद शेवटपर्यंत लुटूं!

पायांच्या प्रसादें । काही बोलिलो विनोदें । मज क्षमा करणें संती । नव्हे अंगभूत युक्ती ॥ नव्हे हा उपदेश । तुमचे वडवडिले शेष । तुमचे कृपेचे पोसणें । जन्मोजन्मी तुका म्हणे ॥

आता विश्वात्मके देवें । येणे वाग्यज्ञे तोषावें । तोषेनि मज द्यावें । पसायदान हें ॥ जे खळांची व्यंकटी सांडो । तयां सत्कर्मी रती वाढो । भूतां परस्परें पडो । मैत्र जीवाचें ॥ दुरिताचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जे वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥



## — रंगावलि अंगणी रंगवुनि

(भैरवी, त्रिताल)

रंगावलि अंगणी रंगवुनि,
कला फुलवु या, कणाकणांतुन !
निर्मू रेखारेखांमधुनी,
चित्र मनोहर अहा प्रांगणी !
सहकाराच्या सुंदर दर्शनी —
स्नेह उजळु दे मनांमनांतुन !
जनाजनांतुन ऐक्यभावना,
कोटिकोटि तनु देशरक्षणा,
हरहरहर महादेव गर्जना !
हिमालयावर जिंकु रणांगण !
कणाकणांची ही रंगावलि,
तनमनसुमनी माला गुंफिली,
कर्मयोग-सहकार-अंजली,
भारतभूला जीवन अर्पण !
अर्पण चरणी हे संकीर्तन !

ॐ शांतिः शांतिः शांतिः

## महाभारतानं रंगविलेली

# जीवनकला

गृध्रदृष्टिर्बकालीनः श्वचेष्टः सिंहविक्रमः।
अनुद्विग्नः काकशंकी भुजंगचरितं चरेत् ॥

कर्मयोगी माणसानं गिधाडाप्रमाणं दूरदृष्टि, बगळ्याप्रमाणं शांत चर्या, कुत्र्याप्रमाणं सावधानता ठेवावी; सिंहाप्रमाणं पराक्रमी, कावळ्यासारखं संशयी, व सर्पासारखं नागमोडी वर्तन ठेवावं.

जिता सभा वस्त्रवता मिष्टाशा गोमता जिता।
अध्वा जितो यानवता सर्वं शीलवता जितम् ॥

पोशाख उत्तम असला तर माणसाला समाजात प्रतिष्ठा मिळते, गोधन बाळगणाऱ्याला मिष्टान्नं मिळतात, वाहन असलं म्हणजे प्रवास सुखकर होतो, शीलवान् माणसाला नेहमी जय मिळतो.

धर्मं पूर्वे धनं मध्ये जघन्ये काममाचरेत्।
अहन्यनुचरेदेवमेष शास्त्रकृतो विधिः ॥

सकाळी धर्मानुष्ठान, दुपारी द्रव्यसंपादनार्थ व्यवसाय, सायंकाळी विश्रांति याप्रमाणं रोजचा दिनक्रम असावा असं शास्त्र सांगतं.

अमित्रो मित्रतां याति मित्रं चापि प्रदुष्यति।
सामर्थ्ययोगात् कार्याणां अनित्या वै सदा गतिः ॥

वेळप्रसंगी शत्रूही मित्र व मित्र शत्रू ठरतात. कारण सर्वच वेळा सारख्या असत नाहीत.

असन्तोषः श्रियो मूलम् ॥

माणसानं उत्कर्षाची महत्त्वाकांक्षा बाळगली पाहिजे. संतुष्ट राहून चालणार नाही. धडपडणाऱ्या माणसालाच धनप्राप्ति होते.

आलस्यं मदमोहौ च चापलं गोष्ठिरेव च ।
स्तब्धता चाभिमानित्वं तथाऽत्यागित्वमेव च
एते वै सप्त दोषाः स्युः सदा विद्यार्थिनां मताः ॥

आळस, अहंकार, मोह, चंचलपणा, सदा गर्दीत राहणें, उद्धटपणा, अभिमान आणि लोभ हे सात दुर्गुण विद्यार्थ्यांनी टाळले पाहिजेत.

उत्थानहीनो राजा हि बुद्धिमानपि नित्यशः ।
प्रधर्षणीयः शत्रूणां भुजंग इव निर्विषः ॥

राजानें फक्त बुद्धिमान असून भागणार नाही, दुसऱ्यावर चढाई करण्याकरता त्यानें नेहमी सिद्ध असलें पाहिजे. नाहीतर विषहीन सर्पाप्रमाण त्याच्यावरच हल्ले होऊं लागतात.

## समर्पण

कायेन वाचा मनसेंद्रियैर्वा बुद्ध्यात्मना वाऽनुसृतस्वभावात् ।
करोति यद्यत्सकलं परस्मै नारायणायेति समर्पयेत् ॥

शरीरानें, वाणीनें, मनानें, इंद्रियांनी, जे जे कर्म मानव करील ते ते सर्व परमात्मा जो नारायण त्याला अर्पण करावं !

---

### उपनिषदांचा संदेश

उत्तिष्ठत जागृत प्राप्यवरान्निबोधत ।

## सहकारी कर्मयोग

# नाट्यसंकीर्तन

---

श्री. त्र्यं. न. कुलकर्णी यांनी

रचलेल्या स्वतंत्र कवितांचा अनुक्रम

## तुमच्या संसारात आम्ही
## आमचे सहकार्य द्यायला
## सतत सिद्ध आहोत!


















**बेडेकर मसालेवाले**

गिरगाव, मुंबई-४ • पुणे डेपो - पेरूगेटजवळ